शिक्षणखात्याचा मंजुरी-क्रमांक : पापुमं/१०९०/बाभाम/१७१२०/(१)/स. दिनांक १७-७-१९९०

इयत्ता तिसरी

मराठी

# बालभारती





महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

| | |
|---|---|
| प्रथमावृत्ती : १९९१<br>पुनर्मुद्रण : १९९७ | © **महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे-४११ ००४.** |
| | महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाकडे या पुस्तकाचे सर्व हक्क राहतील. या पुस्तकातील कोणताही भाग संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, यांच्या लेखी परवानगीशिवाय उद्धृत करता येणार नाही. |
| **मराठी भाषा समिती :** | डॉ. मधुकर आष्टीकर, अध्यक्ष<br>डॉ. भाऊ मांडवकर, सदस्य<br>श्री. दया पवार, सदस्य<br>श्री. व्यंकटेश चौधरी, सदस्य<br>श्री. नरहर मंद्रुपकर, सदस्य<br>सौ. प्रतिभा जंगले, सदस्य<br>सौ. ज्ञानदा नाईक, सदस्य सचिव |
| **चित्रकार :** | श्री. जयप्रकाश जगताप, पुणे |
| **मुखपृष्ठ :** | श्री. महादेव जामसंडेकर |
| **निर्मिती :** | श्री. म. द. गाडेकर, निर्मिती अधिकारी<br>श्री. नितिन तांबे, निर्मिती साहाय्यक |
| **फोटोसेटिंग :** | मे. अक्षर फोटोटाइपसेटर्स, यशोदा सदन, मुंबई-४०० ०१६. |
| **कागद :** | ६१ × ८६ सेमी/६० ग्रॅम क्रीम व्हाईट. |
| **मुद्रणादेश क्र. :** | एम.पी.टी.ओ/टी.बी.... ९७-९८ (९.००) |
| **मुद्रक:** | आशीष ऑफसेट, घाट रोड, नागपूर |
| **प्रकाशक :** | **श्री. पी.वाय. साळवी, नियंत्रक,** पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, मुंबई-४०० ०१८. |

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे.
सारे भारतीय माझे
बांधव आहेत.
माझ्या देशावर माझे प्रेम आहे.
माझ्या देशातल्या समृद्ध आणि
विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे.
त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता
माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.
मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा
आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन
आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.
माझा देश आणि माझे देशबांधव
यांच्याशी निष्ठा राखण्याची
मी प्रतिज्ञा करीत आहे.
त्यांचे कल्याण आणि
त्यांची समृद्धी
ह्यांतच माझे
सौख्य सामावले
आहे.

# प्रस्तावना

'राष्ट्रीय शैक्षणिक धोरण १९८६'नुसार महाराष्ट्र राज्यात 'प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम १९८८' हा तयार करण्यात आला आहे.

या शासनमान्य अभ्यासक्रमावर आधारित मराठी विषयाची इयत्ता १ ली ते ८ वीची नवीन 'बालभारती' माला १९८९-९० या शालेय वर्षापासून पाठ्यपुस्तक मंडळ क्रमशः प्रकाशित करत आहे. या मालेतील तिसरे पुस्तक आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद वाटतो.

आकलन व अभिव्यक्ती साधली की भाषा अवगत झाली, असे म्हणता येते. त्यासाठी श्रवण, वाचन, संभाषण, लेखन यांची कौशल्ये आत्मसात करणे अगत्याचे ठरते. मंडळाने या उद्देशानेच गतवर्षी दुसरीचे पुस्तक प्रकाशित केलेले आहे. आत्मसात केलेली वरील कौशल्ये अधिकाधिक विकसित करण्याचा उद्देश आता डोळ्यांपुढे आहे. स्वाध्यायांचे अनन्यसाधारण महत्त्व लक्षात घेऊन इयत्ता दुसरीच्या पाठ्यपुस्तकात स्वाध्याय भरपूर प्रमाणात व स्वतंत्रपणे अंतर्भूत करण्यात आले होते, परंतु पाठ्यपुस्तकांच्या किमती मर्यादित व वाजवी ठेवणे अत्यावश्यक असल्याने इयत्ता तिसरीपासून स्वाध्याय स्वतंत्रपणे अंतर्भूत न करता प्रत्येक पाठ/कविता संपल्यावर वस्तुनिष्ठ व अत्यंत निवडक स्वरूपातील स्वाध्याय देण्यात आलेले असून अन्य महत्त्वाच्या स्वाध्यायांचा समावेश/निर्देश अध्यापन पुस्तिकेत करण्यात आलेला आहे.

अध्ययन व अध्यापन प्रभावी होण्यासाठी मंडळाने प्रकाशित केलेल्या या पुस्तकाच्या अध्यापन पुस्तिकेचा मुलांकडून स्वाध्याय सोडवून घेण्यासाठी शिक्षक व सुजाण पालकांना लक्षणीय उपयोग होईल असा विश्वास वाटतो.

मंडळाची मराठी भाषा समिती व चित्रकार यांच्या आस्थापूर्वक परिश्रमांतून हे पुस्तक तयार झाले आहे. हे पाठ्यपुस्तक तयार करताना मराठी भाषा समितीला ज्या अनेक साहित्यिकांचे आणि तज्ज्ञांचे सहकार्य लाभले, त्या सर्वांचे मंडळ मन:पूर्वक आभारी आहे.

विद्यार्थी, पालक व शिक्षक या पुस्तकाचे स्वागत करतील अशी आशा आहे.

पुणे:
दिनांक : २९ सप्टेंबर, १९९०
विजयादशमी,
आश्विन ७, शके १९१२

संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

# अनुक्रमणिका

# १. आनंदी-आनंद गडे!

आनंदी-आनंद गडे!
इकडे, तिकडे, चोहिकडे;
वरती-खाली मोद भरे;
वायुसंगे मोद फिरे;
नभात भरला,
दिशांत फिरला,
जगात उरला,
मोद विहरतो चोहिकडे;
आनंदी-आनंद गडे!

सूर्यकिरण सोनेरी हे
कौमुदि ही हसते आहे;
खुलली संध्या प्रेमाने,
आनंदे गाते गाणे;
मेघ रंगले,
चित्त दंगले,
गान स्फुरले,
इकडे, तिकडे, चोहिकडे;
आनंदी-आनंद गडे!

वाहति निर्झर मंदगति,
डोलति लतिका वृक्षतती,
पक्षि मनोहर कूजित रे,
कोणाला गातात बरे?

कमल विकसले,
भ्रमर गुंगले,
डोलत वदले —
इकडे, तिकडे, चोहिकडे;
आनंदी-आनंद गडे!

**मोद** — आनंद. **कौमुदी** — चांदणे.
**निर्झर** — झरा. **वृक्षतती** — झाडांच्या रांगा.

**स्वाध्याय :**

- **खालील शब्दांचे अर्थ लिहा.**
  वायू, भ्रमर, लतिका

  **खालील अर्थाच्या कवितेतील ओळी लिहा.**
  १. सगळीकडे आनंदी-आनंद आहे.
  २. खुललेली संध्याकाळ आनंदाने गाणे गात आहे.
  ३. झरे संथ गतीने वाहत आहेत. वेली आणि वृक्षांच्या रांगा डोलत आहेत.

- **पूर्ण वाक्यांत उत्तरे लिहा.**
  १. आनंद कोठे कोठे आहे?
  २. कोण हसत आहे?
  ३. कोण कोण डोलत आहे?
  ४. भ्रमर काय म्हणत आहेत?

★ ★ ★

# २. खरी पूजा



बंगालमध्ये दसरा हा सण फार महत्त्वाचा आहे. घरोघरी लोक कालिदेवीची नऊ दिवस मोठ्या भक्तिभावाने पूजा करतात. दसऱ्याच्या दिवशी मोठा उत्सव करून त्या पूजेची सांगता होते. देवीचे हे नवरात्र बंगालमध्ये सार्वजनिक सण म्हणून साजरे करतात.

स्वामी विवेकानंद बंगालचे राहणारे होते. त्यांच्या लहानपणची ही गोष्ट आहे. विवेकानंदांचे पूर्वीचे नाव नरेंद्रनाथ होते. त्या वेळी ते नऊ-दहा वर्षांचे असतील. अशाच एका नवरात्रात त्यांच्या आईने त्यांना पूजेसाठी कालिदेवीची मूर्ती आणायला सांगितले. लहानगा नरेंद्र बाजारात गेला. देवीची मातीची सुंदर मूर्ती त्याने विकत घेतली आणि ती हातावर धरून तो घराकडे निघाला. रस्त्यावर तशी फारशी गर्दी नव्हती. पण जागोजागी शिपाई उभे होते. त्या वेळचा इंग्रजसाहेब त्या रस्त्याने जाणार होता. साहेब घोड्याच्या गाडीतून फिरत असे. घोडे वेगाने धावत. रस्त्याने जाणारा गाडीखाली सापडण्याची भीती असे, म्हणून लोकांना रस्त्याच्या कडेने चालायला शिपाई सांगत होते.

नरेंद्र मातीची सुंदर मूर्ती हातावर घेऊन रस्त्याच्या कडेने चालला होता. आता साहेबाची गाडी वेगाने येणार म्हणून लोक त्या दिशेने मोठ्या उत्सुकतेने पाहत होते. शिपाई 'बाजूला व्हा, बाजूला व्हा', असे सारखे ओरडत होते. तेवढ्यात साहेबाची गाडी जवळ आली — आणि त्याच क्षणी एक चार-पाच वर्षांची मुलगी रस्ता ओलांडून पलीकडे जायला धावली. आता ती गाडीखाली सापडणार म्हणून लोक



ओरडले. शिपाई घाबरले, पण तिला बाजूला करायला कोण धावणार? या मुलीबरोबरच तोही त्या गाडीखाली चेंगरला असता. नरेंद्रने ते पाहिले. आपल्या जिवाची पर्वा न करता तो त्या मुलीकडे धावला. डोळ्याचे पाते लवते न लवते तोच त्याने मुलीला दोन्ही हातांनी घट्ट धरून ओढले. गाडी भरधाव पुढे निघून गेली. मुलगी वाचली. नरेंद्राच्या धाडसामुळे ती वाचली. लोकांनी नरेंद्राचे खूप कौतुक केले.



पण नरेंद्राचा चेहरा मात्र पडला. आईने त्याला पूजेसाठी कालिदेवीची मूर्ती आणायला सांगितली होती. कुठे आहे ती मूर्ती? ती रस्त्यावर पडून फुटली होती. नरेंद्र मुलीला वाचवायला धावला तेव्हा ती हातातली मूर्ती त्याला खाली टाकावी लागली होती.

आता आई रागावेल. तो भीत-भीतच घरी गेला. आईने कालिदेवीच्या पूजेची सगळी तयारी केली होती. ती नरेंद्राचीच वाट पाहत होती. नरेंद्र आला. तिला आनंद झाला, पण नरेंद्राच्या हातात देवीची मूर्ती नव्हती.

''देवीची मूर्ती आणली नाहीस?'' आईने विचारले.

नरेंद्र रडायला लागला. रस्त्यावर घडलेला सगळा प्रसंग त्याने आईला सांगितला.



"आई, दुसरा इलाजच नव्हता ग, मुलीला वाचवायचं तर देवीची मूर्ती हातातून टाकणं भागच होतं. मी ती टाकली आणि मुलीला वाचवलं."

आईने नरेंद्राला पोटाशी धरले.

"छान केलंस, बाळा छान केलंस. त्या मुलीला वाचवलंस. खरी देवी वाचवलीस. कालिमातेची खरी पूजा तू केलीस. देव माणसातच पाहावा. मातीच्या मूर्तीत नाही."

---

सांगता — समाप्ती.

स्वाध्याय : ❋ ❋ ❋ ❋ ❋ ❋ ❋ ❋ ❋ ❋ ❋ ❋ ❋

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  १. बंगालमध्ये कोणता सण महत्त्वाचा असतो?
  २. आईने नरेंद्राला कोणते काम सांगितले?
  ३. लोकांना शिपाई काय सांगत होते?
  ४. नरेंद्राने मूर्ती का टाकली?
  ५. आईने नरेंद्राला पोटाशी का धरले?
- **असे कोण कोणाला म्हणाले?**
  १. "बाजूला व्हा, बाजूला व्हा."
  २. "देवीची मूर्ती आणली नाहीस?"
  ३. "दुसरा इलाजच नव्हता ग!"
- **अर्थ लिहा व वाक्यात योजा.**
  १. सांगता होणे २. जिवाची पर्वा न करणे ३. पोटाशी धरणे.

***



## ३. माझे बालपण

आमचे आडनाव 'आंबेडकर' नव्हते. आमचे खरे आडनाव होते 'आंबावडेकर'. आंबावडे या नावाचे, दापोलीजवळ एक लहानसे खेडे आहे. त्यामुळे आम्हांला 'आंबावडेकर' याच नावाने लोक ओळखत असत. या आंबावडेकर आडनावाचे 'आंबेडकर' हे नाव कसे झाले, त्याचा इतिहास आहे. आम्हांला 'आंबेडकर' नावाचे एक मास्तर होते. त्यांचे माझ्यावर फार प्रेम होते. मधल्या सुटीत मला भाकरी खाण्यासाठी शाळेपासून दूर घरी जावे लागे. हे आंबेडकर मास्तरांना पसंत नव्हते. ते

आपल्याबरोबर भाजीभाकरी आणत असत व रोज मधल्या सुटीत कधीही न चुकता आपल्या फराळापैकी भाजीभाकरी मला खायला देत. त्या प्रेमाच्या भाजीभाकरीची अवीट गोडी असे. त्या गोष्टीची आठवण झाली म्हणजे माझा गळा दाटून येतो. एके दिवशी त्यांनीच मला सांगितले, की 'आंबावडेकर' नाव अडनीड आहे. त्यापेक्षा 'आंबेडकर' हे माझे नाव आहे, तेच तू यापुढे लाव. त्याप्रमाणे शाळेच्या हजेरीबुकात त्यांनी नोंद करून टाकली.

माझे वडील कबीरपंथी होते. कबिरांच्या शिकवणुकीचा माझ्यावर फार मोठा परिणाम झाला. कबीर म्हणतात, ' आधी माणूस बना. जो माणूस झाला नाही तो महात्मा कसा होईल? ' माणुसकीचे धडे जोतीराव फुले यांनीही दिले.

माझे वडील मला म्हणत, ' आपण गरीब असलो म्हणून भिण्याचं कारण नाही. तू विद्वान का होऊ शकणार नाहीस? ' एकदा मी कोणती तरी परीक्षा पास झालो होतो. त्या वेळी चाळीतल्या लोकांनी माझा सत्कार करण्याचे ठरवले. माझा सत्कार व्हावा, अशी वडिलांची इच्छा नव्हती. माझे वडील म्हणायचे, ' नको सत्कार. सत्कार केला म्हणजे नेता झालो असे वाटते.' तरी पण सत्कार झालाच. दादा केळुसकरांनी मला बुद्धाच्या चरित्राचे पुस्तक बक्षीस दिले. हे पुस्तक वाचल्यावर मला बुद्धांचे विचार आवडले. कबीर, जोतीराव फुले आणि बुद्ध असे माझे तीन गुरू आहेत. तशीच माझी तीन दैवते आहेत.



माझे पहिले दैवत विद्या. विद्येशिवाय मानवाला कुणी विचारत नाही. विद्या ही सर्वांना अवगत झाली पाहिजे. माणसाला जगायचे असेल तर जशी अन्नाची आवश्यकता आहे, तशीच विद्येचीही आहे.

माझे दुसरे दैवत स्वाभिमान. मी कण्यांचा भात आणि कण्यांची भाकरी खाल्ली, पण नोकरीसाठी कुणापुढे कधी हात पसरला नाही. भारी पगाराचा मोह धरला नाही. मी माझे स्वतःचे पोट स्वतःच्या कष्टाने भरले आणि समाजाची सेवा केली. तेव्हा माझे सांगणे हेच की लाचारी असू नये.

माझे तिसरे दैवत म्हणजे शील. माझ्या आयुष्यात मी कुणाची कधी फसवणूक केली नाही. मी विलायतेला अनेक वेळा गेलो, पण मला कसलेही नको ते व्यसन मी लागू दिले नाही. पुस्तके आणि कपडे यांचेच काय ते व्यसन लागले. चांगली वागणूक जोपासण्याचा मी सतत प्रयत्न केला.

**अडनीड** — गैरसोईचे.

**स्वाध्याय :**

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

  १. बाबासाहेबांचे मूळचे आडनाव कोणते होते?

  २. डॉ. आंबेडकरांचे तीन गुरू कोणते?

  ३. 'सत्कार नकोत' असे डॉ. आंबेडकरांच्या वडिलांना का वाटे?

  ४. डॉ. आंबेडकरांनी कोणती दैवते मानली?

- **वाक्यात उपयोग करा.**

  १. अवगत होणे २. हात पसरणे.

- **खालील जोडशब्द पूर्ण करा.**

  जसे — भाजीभाकर

  १. घर.............. २. पैसा..............

  ३. भांडी.............. ४. दीन..............

- **योग्य जोड्या लावा.**

  जसे — हिंदू-देऊळ

| | |
|---|---|
| १. मुसलमान | चर्च |
| २. बौद्‌ध | गुरुद्‌वार |
| ३. शीख | विहार |
| ४. ख्रिश्चन | अग्यारी |
| | मशीद |

- **वळणदार अक्षरांत लिहा.**

  १. विद्येशिवाय मानवाला कोणी विचारत नाही.

  २. विद्या सर्वांना अवगत झाली पाहिजे.

* * *

# ४. माझ्या अंगणात

माझ्या अंगणात  सडा तारकांचा
नभी माणकांचा  जेवी साजे
माझ्या अंगणात  लावियला झेंडू
कुठे तुज धुंडू  माळीदादा?
माझ्या अंगणात  लावियली जाई
वास परी जाई  दिगंतरी
माझ्या अंगणात  लाविली शेवंती
वसंत भवती  फिरतसे
माझ्या अंगणात  फुले फुलवंती
भृंग गुंजताती  फुलांवरी
माझ्या अंगणात  लाविला अशोक
वरी शुक पिक  बसतसे
माझ्या अंगणात  लावियली जुई
झुळूक ही येई  गंधासाठी
माझ्या अंगणात  मोगऱ्याचा भर
बाळ ही चतुर  गुंफी माळ

**भृंग** – भुंगा. **पिक** – कोकीळ. **शुक** – पोपट.
**दिगंतरी** – दूरपर्यंत. **गंध** – वास.

**स्वाध्याय :**

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  १. अंगणात कोणकोणती फुलझाडे आहेत?
  २. कोणत्याही चार सुगंधी फुलांची नावे लिहा.
  ३. कोणत्याही चार वृक्षांची नावे लिहा.
- **खालील अर्थाच्या कवितेतील ओळी लिहा.**
  १. भुंगे फुलांवर गुंजन करतात.
  २. माझ्या अंगणातील अशोक वृक्षावर पोपट व कोकिळा बसतात.
- **गटात न बसणारा शब्द लिहा.**
  १. पेरू, जांभूळ, सीताफळ, कर्दळ, रामफळ.
  २. गुलाब, चमेली, शेवंती, केळी, झेंडू.
  ३. मळा, वाफा, मोट, विहीर, बंगला.
- **खालील ओळींत योग्य विरामचिन्ह वापरा.**

माझ्या अंगणात लावियला झेंडू
कुठे तुज धुंडू माळीदादा

* * *





# ५. एक होता बाळू

एक होता बाळू. तो तरुण व धडधाकट होता. त्याला नोकरी करणे आवडत नव्हते आणि धंदा करायचा तर जवळ पैसा नव्हता. तो निराश झाला. आळशी बनला. आता आपल्या डोक्याला कधी त्रासच द्यायचा नाही, असे त्याने ठरवून टाकले. कुणी जसे सांगेल तसेच आणि तेवढेच तो करायचा. लोक त्याला 'सांगकाम्या बाळू' म्हणू लागले.

गावात त्याचा मामा राहायचा. एकदा त्याने बाळूच्या हातात पैसे दिले आणि म्हणाला, ''सांभाळून ने. घरी आईजवळ दे.''

मामाने हातात दिलेले पैसे त्याने हातातच धरून ठेवले. रस्त्याने जाताना कुणाचा तरी धक्का लागला. ते पैसे रस्त्यात पडले. बाळूच्या लक्षात आले नाही. घरी गेल्यावर पाहतो तर हातात पैसे नाहीत! आई रागावली आणि म्हणाली, ''मामानं पैसे सांभाळून ने म्हणून सांगितलं होतं ना? मग ते खिशात घालून नाही का आणायचे?''

बाळूला कळले की सांभाळून आणायचे म्हणजे खिशात घालून आणायचे.

दुसऱ्या वेळी मामाने बाळूजवळ घरच्या म्हशीचे दूध तांब्यात घालून दिले आणि म्हटले, "बाळू, सांभाळून ने. मागच्यासारखं करू नकोस."

बाळूने मानेनेच नाही म्हटले आणि तो रस्त्याने निघाला. सांभाळून नेणे म्हणजे हातांतून नेणे नव्हे तर खिशात घालून नेणे, हे त्याला आठवले. त्याने लगेच दुधाचा तांब्या खिशात ओतला!

घरी गेल्यावर आईला दुधाचा रिकामा तांब्या दिसला. ती बाळूला म्हणाली, "यातलं दूध काय झालं?" बाळू म्हणाला, "मागच्या वेळी तूच म्हणाली होतीस की सांभाळून आणायचं म्हणजे खिशात घालून आणायचं. म्हणून मी दूध या खिशात ओतलं होतं. ते सगळं खिशातून खाली झिरपलं वाटतं?"



आई पुन्हा रागावली, "अरे, मामा तुला दुधाचा तांब्या सांभाळून ने म्हणाला नं? तेव्हा खिशात नाही, तर डोक्यावर ठेवून आणायचा."

बाळूने मान डोलवली आणि म्हणाला, "चुकलंच. डोकं वापरायला पाहिजे होतं. मी खिसा वापरला. यापुढं डोकंच वापरीन."

तिसऱ्या वेळी मामाने घरी न्यायला लोण्याचा गोळा दिला

आणि पुन्हा 'सांभाळून ने' म्हणून बजावले आणि म्हणाला, "डोकं वापरत जा."

"हो", म्हणून बाळू लोण्याचा गोळा घेऊन निघाला. डोके वापरायचे हे त्याला लगेच आठवले. त्याने लोण्याचा गोळा डोक्यावर घेतला. रस्त्याने जाताना उन्हामुळे लोणी वितळले. बाळूच्या तोंडावर ओघळले. कपड्यांवर ठिकठिकाणी डाग पडले!

त्याचा तो अवतार पाहून आईने विचारले, "हे काय रे बाळू? मामानं या वेळी काय दिलं होतं?"

बाळू म्हणाला, "लोणी. तू आणि मामा दोघेही म्हणाला होतात ना, की सांभाळून आणायचं म्हणजे डोक्यावर ठेवून आणायचं, डोकं वापरायचं, म्हणून मी ते लोणी डोक्यावर ठेवलं."

आई सगळे समजली आणि म्हणाली, "अरे वेड्या, ते सांभाळून आणायचं म्हणजे केळीच्या पानात बांधून आणायचं. त्यावर खूप पाणी शिंपडायचं."

बाळूने लगेच मान डोलवली आणि म्हणाला, "समजलं. यापुढं चूक करणार नाही."

चवथ्यांदा मामाने बाळूला कुत्र्याचे सुंदर पिलू दिले आणि म्हणाला, "हे चांगल्या जातीचं कुत्रं आहे. विकून चांगले पैसे येतील. घरी सांभाळून ने."

बाळूने मामाला पिलू सांभाळून नेण्याची खात्री दिली. ते पिलू घेऊन तो निघाला. रस्त्याने केळीची चार पाने तोडली. त्यांत ते



पिलू करकचून बांधले. मग त्यावर खूप पाणी शिंपडले आणि तसेच घरी आणले.

घरी येईपर्यंत ते पिलू गुदमरले.

ते पाहताच आईने कपाळावर हात मारला आणि म्हणाली, ''अरे बाळ्या अगदीच वेडा आहेस रे तू. हे काय सांभाळून आणणं झालं? खांद्यावर घ्यायचं नीट. प्राण्याला असं बांधून आणू नये.''

बाळूने जीभ चावली. ''अरे हो चुकलोच. पण यापुढं प्राण्याला बांधून आणणार नाही. खांद्यावर आणीन,'' अशी त्याने खात्री दिली.

पाचव्यांदा मामाने बाळूला उमदे गाढव दिले आणि म्हणाला, ''बाळ्या, हे गाढव भाड्यानं दे. याच्या पाठीवर माल वाहून नेता येतो. चांगले पैसे मिळतील. पण सांभाळून ने. मागल्यासारखं करू नकोस हं!''

बाळूने या वेळी पक्की खात्री दिली. तो गाढव घेऊन रस्त्यावर आला. लगेच त्याच्या पोटाखाली त्याने आपली मान घातली आणि त्या गाढवाला खांद्यावर उचलले. त्याच्या ओझ्याने बाळू वाकला. गाढव लाथा मारू लागले, ओरडू लागले! पण बाळूने 'सांभाळून न्यायचेच' असा चंग बांधला. त्याने गाढवाला मानेवर आणखी दाबून धरले. गाढव आणखी जोराने ओरडू लागले.





ती गंमत पाहायला त्याच्यामागे मुले लागली. ती गाढवासारखी ओरडू लागली. वाकलेला बाळू, ओरडणारे गाढव आणि मागे मुले अशी वरात निघाली.

घराघरांतून लोक बाहेर येऊन ती गंमत पाहू लागले. जोरजोराने हसू लागले. एका घरातून एक मुलगी बाहेर आली. ती वरात पाहून तिलादेखील खूप हसू कोसळले. ती जोरजोराने हसून आपल्या बाबांना 'बाबा बाबा, लवकर बाहेर या' अशा हाका मारू लागली.

तिचे वडील धावतच बाहेर आले. त्यांची ती मुलगी वास्तविक मुकी होती. ती खूप हसेल तरच बोलायला लागेल, असे डॉक्टर म्हणाले होते. त्यांनी तिला हसवण्याचे खूप प्रयत्न केले होते, पण त्यांची मुलगी हसलीच नव्हती. आता ती जोरजोरात हसली आणि बोलू लागली. तिच्या वडिलांना खूप आनंद झाला.

आपली मुलगी बाळूमुळे हसली हे पाहताच त्यांनी बाळूला घरात आणले. त्याला खूप उंची कपडे दिले. खूप खूप पैसा दिला आणि एक ऐटबाज घोडा दिला.

बाळू घोड्यावर बसून घरी आला. चांगले कपडे, खूप पैसे आणि घोडा घेऊन आलेल्या बाळूला पाहताच आईला खूप



खूप आनंद झाला. तिने बाळूला पोटाशी कवटाळले.

खूप पैसे मिळताच बाळूची निराशा संपली. त्याचा आळसदेखील गेला. तो जोमाने कामाला लागला. आता त्याने व्यापार सुरू केला. प्रामाणिकपणे व्यापार करून त्याने खूप पैसा कमावला.

आता लोक त्याला बाळूऐवजी 'बाळासाहेब' म्हणू लागले.

---

**गुदमरणे** – श्वास कोंडणे. **चंग बांधणे** – निश्चय करणे.

**स्वाध्याय :**

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

  १. लोक बाळूला 'सांगकाम्या' का म्हणू लागले?

  २. बाळूने दुधाचा तांब्या खिशात का ओतला?

  ३. मामाने लोणी दिल्यावर बाळूने काय केले?

  ४. कुत्र्याचे पिलू का गुदमरले?

  ५. मुलीच्या वडिलांनी बाळूला ऐटबाज घोडा का दिला?

- **का ते लिहा.**

  १. बाळू निराश झाला.

  २. मुले बाळूच्या मागे लागली.

  ३. लोक बाळूला बाळासाहेब म्हणू लागले.

- **विरूद्ध अर्थाचे शब्द लिहा.**

  तरूण, धडधाकट, आळशी, रिकामा.

- **अर्थ सांगून वाक्यात उपयोग करा.**

  मान डोलावणे, डोके वापरणे, हसू कोसळणे.

* * *



# ६. जंगलातील एक सायंकाळ

सायंकाळ झाली. पश्चिमेकडील डोंगराआड सूर्य हळूहळू मावळू लागला. त्याच्या किरणांनी जंगलातला पाणवठा सोनेरी झाला.

पक्ष्यांचा एक थवा पालापाचोळा उलटापालटा करून त्यातले किडे टिपत होता. इतक्यात पाणवठ्याजवळच्या झुडपात काहीतरी खसखसले. त्याबरोबर तो थवा आरडाओरडा करत एकदम उठला. कारण पाण्याकडे येणारे एक मुंगूस त्या पक्ष्यांनी पाहिले होते.

मुंगूस पाणवठ्याजवळ गेले. भरपूर पाणी प्याले आणि आल्या वाटेने निघून गेले.

दूरवर माडांचे शेंडे हलू लागले. माकडांची टोळी झाडांवर उड्या घेत पाणवठ्याकडे येत होती. दोन-चार मोठी माकडे टेहळणी करण्यासाठी एका उंच झाडाच्या शेंड्यावर चढून बसली. प्रथम एकच माकड खाली आले. दोन पायांवर उभे राहून त्याने आजूबाजूला पाहिले. मग ते हळूहळू पाणवठ्याकडे सरकले. पाण्याजवळ जाऊन बसले. त्याची दृष्टी चारी दिशांना फिरत होती. बारकासाही आवाज आला तरी ते दचकत होते. ते

थोडे पाणी प्याले. लगेच पुन्हा दूर झाले. क्षणभर आजूबाजूला नजर टाकत त्याने अंग खाजवले. आता मात्र काही धोका नाही, अशी त्याची खात्री झाली. ओणव्याने पाण्यात तोंड बुडवून ते पाणी प्याले. मग एकामागे एक साऱ्या माकडांनी तहान भागवली. त्यांच्यातली पोरे पाणी प्याली. झाडांखाली पडलेली फळे त्यांनी खाल्ली. माकडांची ती टोळी आली तशी निघून गेली. काही वेळ सारे शांत झाले.

ती शांतता चितळांच्या 'कुकू कुकू' आवाजाने भंगली. वठलेल्या झाडाच्या खोडावर चोचीने ठोके मारत असलेला सुतारपक्षी बिचकून थांबला. इतक्यात सांबराने 'खॉक' करून इशारा दिला.

त्या सर्वांनी वाघ गुहेतून बाहेर पडल्याचे जाणले होते. म्हणून त्यांचे इशारे चालले होते. वाघ शिकार शोधण्यासाठी निघाला होता. लवकरच तो पाण्यावर येणार होता.



इतक्यात काहीतरी पाण्यावर येऊन पडले. एक भले दांडगे रानडुक्कर धावत पाण्यात शिरले होते. सारे पाणी त्याने गढूळ करून टाकले. वाघ पाण्यावर येत असल्याची चाहूल त्यालाही आता लागली. ते पाण्याबाहेर आले. मुंडी खाली घालून व सुळे रोखून ते तयार झाले.

रानडुकराला पाहून वाघ एका झेपेत पाणवठ्याजवळ आला. जंगल थरारून टाकणारी डरकाळी त्याने फोडली.

रानडुकराने वाघाकडे जोराची मुसंडी मारली. चपळ वाघाने बाजूला उडी घेऊन ती चुकवली. आपल्या पंजाचा फटकारा त्याने रानडुकराला मारला. रानडुकराला तो निसटता लागला. भरधाव वेगाने ते जंगलात शिरले.

वाघ हळूहळू शांत झाला. खुशीच्या दोन डरकाळ्या फोडून तो पाण्यात शिरला. मचमच करत तो पोटभर पाणी प्याला. मग पाण्यात पडून त्याने आपले तापलेले अंग गार केले. जरा वेळाने पाण्याबाहेर येऊन त्याने आपले अंग कुत्र्यासारखे



**झाडले. काळे पट्टे असलेले त्याचे पिवळेधमक अंग चकाकू लागले. शिकार शोधण्यासाठी तो निघून गेला.**

**भयभीत झालेले प्राणी व पक्षी आतापर्यंत गप्प होते. त्यांची हालचाल आता पुन्हा मोकळेपणाने सुरू झाली.**

---

**टेहळणी** — बारकाईने पाहणी.

**स्वाध्याय :**

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

  १. पाणवठ्यावर पाणी पिण्यासाठी कोण कोण आले?

  २. पाणवठ्यातील पाणी कोणी गढूळ केले?

  ३. सुतारपक्षी व सांबर यांचे इशारे का चालले होते?

  ४. प्राणी व पक्षी यांची हालचाल मोकळेपणाने केव्हा सुरू झाली?

  ५. सायंकाळचे वर्णन करणारी वाक्ये लिहा.

- **का ते लिहा.**

  १. थवा आरडाओरडा करत एकदम उठला.

  २. वाघाने जंगल थरारून टाकणारी डरकाळी फोडली.

  ३. दूरवर माडांचे शेंडे हालू लागले.

- **विरुद्ध अर्थाचे शब्द लिहा.**

  धोका, शांत, चपळ, गढूळ.

- **खालीलप्रमाणे वाक्ये बनवा.**

  जसे — मुंगूस भरपूर पाणी पिते — मुंगूस भरपूर पाणी प्याले.

  १. माकड खाली येते.

  २. ते भरधाव वेगाने जंगलात शिरते.

* * *

# ७. श्रावण आला!

श्रावण आला अभाळ भरले, निळ्या निळ्या मेघांनी
मेघांचे काफिले सरकती, डोंगरमाथ्यावरुनी.

शुभ्र झऱ्यांच्या रेशिम धारा, झरती शिखरांवरुनी
निर्झर खळखळते बागडती, हिरव्या ओल्या रानी.

गर्द तरूंच्या निळ्या सावल्या, पांघरल्या कुरणांनी
पिवळे पिवळे ऊन कोवळे, चमके पानोपानी.

पठारावरी गाईवासरें, चरती निवांतवाणी
बालगुराखी गीत रांगडे, घुमवी पाव्यामधुनी.

शेतामधली पिके डोलती, पक्षी गाती गाणी
श्रावण आला, श्रावण आला, नवजीवन घेउनी.



**तरू** — झाड. **काफिला** — समूह. **निवांतवाणी** — शांतपणे.

**स्वाध्याय :**

- **खालील अर्थाच्या कवितेतील ओळी लिहा.**

  १. निळ्या निळ्या ढगांनी आभाळ भरून गेले.

  २. कुरणांनी दाट झाडांच्या निळ्या सावल्या पांघरल्या आहेत.

  ३. भिजलेल्या रानामधून झरे खळखळत आनंदाने उड्या मारत आहेत.

  ४. गाईवासरे शांतपणे पठारावर चरत आहेत.

- **श्रावण महिन्यात दिसणाऱ्या देखाव्याबद्दल पाच वाक्ये लिहा.**

- **आज ढगांनी आभाळ भरले आहे; या वाक्यातील 'आज' या जागी काल व उद्या हे शब्द योजून वाक्ये लिहा.**

  (१) उद्या — (२) काल —



# ८. शूरवीर प्रीतिलता

त्या वेळी भारतावर इंग्रज राज्य करत होते. ते भारतीय लोकांना कमी लेखत. त्यांचा अपमान करत. ही वाईट दशा संपावी म्हणून अनेक भारतीय प्रयत्न करत होते. भारत स्वतंत्र होणे हाच त्यावर एकमेव उपाय होता. म्हणून स्वातंत्र्यासाठी जनतेने लढा पुकारला. हा लढा दडपून टाकण्यासाठी इंग्रजांनी बंदूक उचलली. देशभक्त जनतेवर ते गोळीबार करू लागले. त्यात अनेक स्त्री-पुरुष मारले गेले. आता देशभक्त देखील शस्त्रे जमवून जुलमी इंग्रजांना व त्यांच्या शिपायांना ठार करू लागले. अशा देशभक्तांना क्रांतिकारक म्हणत. भारतीय स्वातंत्र्याच्या



लढ्यात या क्रांतिकारकांचा वाटा फार मोठा आहे. भारताच्या स्वातंत्र्यासाठी प्राण तळहातावर घेऊन ते इंग्रजांशी लढले.

अशाच एका क्रांतिकारक तरुण मुलीची ही गोष्ट आहे. त्या तरुणीचे नाव होते प्रीतिलता वड्डेदार. ही बंगालमधील चितगावची राहणारी होती. ती पैशाने गरीब पण देशभक्तीने श्रीमंत होती. त्या वेळी क्रांतिकारकांच्या अनेक संघटना होत्या. त्यांतल्या एका संघटनेची प्रीतिलता सभासद झाली. सूर्यसेन नावाचे एक देशभक्त त्या संघटनेचे अध्यक्ष होते.

क्रांतिकारकांच्या संघटना जुलमी इंग्रजांवर आणि त्यांच्या शिपायांवर लपून-छपून हल्ले करत. त्यांना सळो की पळो करून सोडत. इंग्रज या क्रांतिकारकांच्या शोधात असत. त्यांच्या लपण्याच्या जागा हुडकून काढत.





हे क्रांतिकारक एकदा दालघाट नावाच्या खेड्यात लपून बसले होते. इंग्रजांना या गुप्त जागेचा सुगावा लागला. त्यांनी त्या खेड्याला गराडा घातला. आता इंग्रजांच्या तावडीतून सुटणे कठीण दिसू लागले, तेव्हा या क्रांतिकारकांनी इंग्रजांवर तुटून पडण्याचा निर्णय घेतला. आपल्या बंदुका सरसावून ते बाहेर पडले आणि इंग्रजांवर धाड् धाड् गोळ्या झाडू लागले. प्रीतिलता त्यात आघाडीवर होती. इंग्रजांनीही गोळीबार सुरू केला. इंग्रजी शिपायांचा कॅप्टन एक गोरा इंग्रज होता. त्याचे नाव होते 'कॅमेरॉन'. शिपायांची संख्या मोठी होती. त्यांना हरवणे कठीण जाऊ लागले. क्रांतिकारक पकडले जाणार असे दिसू लागताच प्रीतिलतेने युक्ती केली. आपल्या प्राणाची पर्वा

न करता ती त्या शिपायांमध्ये शिरली आणि आपल्या बंदुकीतील गोळी झाडून तिने त्या 'कॅमेरॉन'चेच प्राण टिपले. कॅप्टन ठार झालेला दिसताच शिपाई पळत सुटले आणि क्रांतिकारक बचावले.

प्रीतिलतेच्या युक्तीची सर्वांनी वाहवा केली. सूर्यसेन म्हणाले, ''मुली मनाने हळव्या असतात, भित्र्या असतात असे मानले जाते. म्हणून आम्ही त्यांना क्रांतिकारकांच्या संघटनेत सामील करून घेत नव्हतो, पण तू आगळे धैर्य दाखवलेस. शाब्बास!''

प्रीतिलतेला भरून आले!



तिला लगेच त्या क्रांतिकारकांच्या तुकडीची प्रमुख म्हणून नेमण्यात आले. आता 'पहारतली' नावाच्या इंग्रजांच्या एका पोलिस ठाण्यावर हल्ला करण्याचे ठरले. भारत स्वतंत्र व्हावा, ही एकमेव इच्छा मनात धरून ते क्रांतिकारक तरुण पहारतली-वर हल्ला करायला निघाले. प्रीतिलता आघाडीवर होती.

देशभक्त सूर्यसेन ते दृश्य पाहून भारावून गेले. ते प्रीतिलतेला म्हणाले, ''मुली, तुझी देशभक्ती आणि धडाडी पाहून मी थक्क झालो आहे. तुझ्यासारख्या वीरांगना आहेत, तेव्हा देश स्वतंत्र व्हायला वेळ लागणार नाही. जा. यशस्वी व्हा!''

'वंदे मातरम्'चा जयघोष करत प्रीतिलता आणि तिचे सोबती त्या पहारतली ठाण्याकडे निघाले. सर्वत्र अंधार पसरला होता. काट्या-गोट्यांतून ठेचाळत ते मार्ग काढत होते. पहारतलीला ते मध्यरात्री पोहोचले. तिथल्या क्लबात इंग्रज लोक मौज करत होते. प्रीतिलतेच्या तुकडीने त्या क्लबला गराडा घातला.

— आणि क्षणातच 'वंदे मातरम्' म्हणून तिने क्लबाचे रक्षण करणाऱ्या इंग्रजांच्या शिपायांवर गोळी झाडली. इंग्रज गडबडले. घाबरले. कसेबसे धावत-पळत बंदुका सावरून बाहेर आले. देशभक्तीने पेटलेल्या प्रीतिलतेने अनेक शिपायांचे मुडदे पाडले! त्या रणचंडिकेचा तो आवेश पाहून इंग्रजही चकित झाले!

पण दुर्दैवाने त्या चकमकीत इंग्रजांच्या बंदुकींतून

सुटलेली एक गोळी प्रीतिलतेला लागली आणि ती कोसळली, पण कोसळतानाही तिच्या ओठातून 'वंदे मातरम्' हा एकच जयघोष बाहेर पडत होता. क्रांतिकारक हळहळले!

इंग्रजांनीही त्या कोवळ्या तरुणीच्या धाडसापुढे मस्तक झुकवले.

प्रीतिलतेचे बलिदान वाया गेले नाही. त्यानंतर काही वर्षांतच भारत स्वतंत्र झाला!

**जयघोष** – जयजयकार. **रणचंडिका** – युद्धात पराक्रम गाजवणारी.

**स्वाध्याय :**

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  १. प्रीतिलतेने दालघाट येथे कोणता पराक्रम केला?
  २. आघाडीवर असलेल्या प्रीतिलतेला सूर्यसेन काय म्हणाले?
  ३. प्रीतिलतेचे बलिदान वाया गेले नाही, असे का म्हटले आहे?
- **रिकाम्या जागी कंसातील योग्य शब्द लिहा.**
  (कॅमेरॉन, प्रीतिलता, सूर्यसेन)
  १. क्रांतिकारकांच्या संघटनेचे अध्यक्ष —
  २. एक गोरा इंग्रज कॅप्टन —
  ३. क्रांतिकारकांच्या तुकडीची प्रमुख —
- **समान अर्थाचे शब्द लिहा.**
  जनता, वीर, धैर्य, मित्र.
- **वाक्यांत उपयोग करा.**
  (१) सळो की पळो करून सोडणे. (२) सुगावा लागणे. (३) प्राणांची पर्वा न करणे. (४) थक्क होणे.

★ ★ ★



# ९. जगदीशचंद्र बोस

'तू ताडामाडासारखा नुसता उंच वाढला आहेस.'

अशा प्रकारे भाषेत माणसांना झाडांची उपमा देतात. पण माणूस व झाड यांच्यात खरोखरच सारखेपणा आहे का? माणसाप्रमाणेच झाडाला सुखदु:खाच्या भावना आहेत का? गुंगीचे औषध देऊन माणसावर शस्त्रक्रिया करतात, त्या वेळी माणसाला वेदना होत नाहीत. झाडांचेही तसेच आहे का? विष दिल्याने माणसे मरतात, तशीच झाडेही मरतात का? माणूस झोपतो तशी झाडेही झोपतात का?

या सगळ्या प्रश्नांची उत्तरे 'होय' अशी आहेत. भारतातल्या एका थोर संशोधकाने ते प्रयोगांच्या द्वारा सिद्ध केले आहे. या संशोधकाचे नाव आहे जगदीशचंद्र बोस!

जगदीशचंद्र बोस शाळेत शिकत असताना बागेतून काम करणाऱ्या मजुरांच्या मुलांशी त्यांची मैत्री झाली. त्यांच्याबरोबर जगदीशचंद्र बोस नेहमी बागेत जात. तिथली हिरवीगार झाडे, रंगीबेरंगी फुले आणि गोडगोड फळे पाहून जगदीशचंद्र भान विसरत. ते झाडांत रमून जात. झाडांशी बोलत असत.

त्यांच्या मित्रांना गंमत वाटे. ते जगदीशचंद्रांना विचारत, ''तुझ्याशी झाडे बोलतात?''

ते म्हणत, ''होय.''

पुढे जगदीशचंद्र खूप शिकले. परदेशात जाऊन उच्च शिक्षण घेऊन आले. वनस्पतिशास्त्रात ते संशोधन करू लागले. त्यांनी लहान-लहान यंत्रे तयार केली. गुंगीचे औषध, विष आणि दारू यांचा माणसासारखाच झाडावरही परिणाम होतो, हे त्यांनी यंत्रांच्या साहाय्याने दाखवून दिले. माणसांसारखी झाडेदेखील साधारणपणे रात्री बारा ते सकाळी आठ वाजेपर्यंत झोपतात हे त्यांनी प्रयोग करून सिद्ध केले.

लाजाळूच्या झाडाला हात लावला, की त्याची पाने लगेच मिटतात व फांदी मरगळते. लाजाळूला विजेचा धक्का एका सेकंदात बसतो आणि पुन्हा शुद्धीवर यायला माणसाप्रमाणेच त्यालाही बारा मिनिटे लागतात, हे त्यांनी एका छोट्याशा यंत्राच्या द्वारा दाखवून दिले. हे यंत्र खूपच साधे होते. एका काचेच्या तुकड्यावर काजळ फासलेले होते. लाजाळूच्या फांदीला एक बारीक सुई लावलेली होती. लाजाळूला विजेचा

छोटासा धक्का देण्याची सोयही केलेली होती. तो धक्का देताच लाजाळूवर परिणाम होई. त्याचा आलेख त्या सुईमुळे काजळ लावलेल्या काचेवर निघत असे.

हे त्यांचे नवीन संशोधन जगभर गाजले. त्यांना सर्वत्र खूप मानसन्मान मिळाले. इंग्लंडच्या राणीने तर त्यांना 'सर' ही बहुमानाची पदवी दिली. सर जगदीशचंद्र बोस हे भारताचे महान सुपुत्र ठरले. त्यांच्या संशोधनाने जग चकित झाले.

---

उपमा देणे – सारखेपणा दाखवणे.

स्वाध्याय :

- पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.
  १. जगदीशचंद्र कोणत्या गोष्टीत रमत असत?
  २. जगदीशचंद्रांनी कोणकोणत्या गोष्टी प्रयोगाने दाखवून दिल्या?
  ३. जगदीशचंद्रांना त्यांचे मित्र कोणता प्रश्न विचारत?
- रिकाम्या जागा भरा.
  १. माणसाप्रमाणे झाडाला ........................ भावना आहेत.
  २. जगदीशचंद्र बोस वनस्पतिशास्त्रात .............. करू लागले.
  ३. इंग्लंडच्या राणीने जगदीशचंद्रांना ........................ ही बहुमानाची पदवी दिली.
- वाक्यात उपयोग करा.
  (१) प्रयोग करणे. (२) सिद्ध करणे. (३) चकित होणे. (४) परिणाम होणे.

★ ★ ★

# १०. आईच्या कुशीत





आईच्या कुशीत
जगले निवांत
कधी ना भासली
कशाचीच भ्रांत.

आईच्या गोष्टीत
वात्सल्य उफाळे
हासत जगावे
त्यातून शिकले.



आईचे शिक्षण
शाळेहून मोठे
अडले न काही
जीवनाच्या वाटे.

आईच्या वाणीत
प्रेम दरवळे
भोवतीचे जग
सारे सुखावले.



आईच्या छायेत
काळजी नुरली
शिकवली तिने
माणुसकी भली.

---

**भ्रांत** — काळजी. **वात्सल्य** — प्रेम.

**स्वाध्याय :**

- **'माझी आई' या विषयावर पाच वाक्ये लिहा.**
- **खालील शब्दांचे अर्थ लिहा.**
  निवांत, नुरली, माणुसकी.
- **या कवितेतील तुम्हांला आवडलेले एक कडवे वळणदार अक्षरांत लिहा.**

★ ★ ★



# ११. दहा पैशांत पंखा

## प्रवेश पहिला

(आरामसेन राजाचा दरबार — हुजऱ्याची ललकारी — 'सावधान. महाराज आरामसेन येत आहेत होऽऽ'. आरामसेन येतो. हुश्श करत खुर्चीत बसतो. दासी पंख्याने वारा घालते.)

**आरामसेन :** चतुरसेन, अहो चतुरसेन, चतुरसेन कुठे आहेत? आज दरबारात आमचे प्रधान आले नाहीत?

**सरदार :** आले आहेत महाराज.

**आरामसेन :** मग कुठे दिसत नाहीत ते?

**सरदार :** बाहेर प्रजेच्या तक्रारी स्वीकारत आहेत.

**आरामसेन :** प्रजेच्या तक्रारी? प्रजा नाराज आहे आमच्यावर? (चतुरसेन प्रवेश करतो.)

**चतुरसेन :** होय महाराज. आपल्या राज्यात उकाडा भयंकर होत आहे. उकाड्यामुळे प्रजा हैराण झाली आहे.

**सरदार :** होय महाराज. आम्हांलाही उकाड्यामुळे काही सुचत नाही.

**आरामसेन :** मग दरबारात कामकाज कसं होणार?

**सरदार :** आम्हांला सुट्टी द्यावी महाराज. दरबार उद्यावर ढकलावा.

आरामसेन : आजचं उद्यावर ढकलणं आम्हांला नेहमीच आवडतं. चतुरसेन, दरबार उद्यावर ढकलण्यात येत आहे. सर्व सरदारांना घरी जाऊ द्या. इतर नोकरांनाही आज सुट्टी द्या. फक्त तुम्ही थांबा.

चतुरसेन : जशी महाराजांची आज्ञा. 'ऐका — आजचे दरबाराचे कामकाज उद्यावर ढकलण्यात येत आहे. सर्वांनी घरी जावे.'

(दरबारी लोक जातात. फक्त महाराज व चतुरसेन दरबारात आहेत.)



आरामसेन : चतुरसेन, प्रजा आमच्यावर नाराज आहे, असं म्हणालात?

चतुरसेन : होय महाराज.

आरामसेन : मग आमचं आसन कसं टिकणार? प्रजेची नाराजी घालवा. उकाड्यामुळे त्यांना खूप त्रास होतो. तो दूर करा. जनतेला पंखे द्या. पण ते अगदी स्वस्त असले पाहिजेत.

चतुरसेन : त्याची तुम्ही काळजी करू नका. त्यांना फक्त दहा पैशांत पंखा मिळेल, अशी व्यवस्था करतो.



| | |
|---|---|
| आरामसेन : | फक्त दहा पैशांत? चतुरसेन, शुद्धीवर आहात ना? दहा पैशांत कसा मिळेल पंखा? |
| चतुरसेन : | मी पूर्ण शुद्धीवर आहे महाराज. लोकांना फक्त दहा पैशांतच पंखा मिळेल. |
| आरामसेन : | अरे वा! मग तर लोक आमच्यावर बेहद खूश होतील. |
| चतुरसेन : | आणि तुम्ही जन्मभर सुखानं राज्य कराल. |
| आरामसेन : | शाब्बास चतुरसेन, आम्ही तुमच्यावर प्रसन्न झालोत. मग ताबडतोब पंख्यांची व्यवस्था करा. |
| चतुरसेन : | पंचवीस लाख पंखे तयार करायला सांगतो. |



आरामसेन : कुणाला?

चतुरसेन : त्या 'सटरफटर वस्तुनिर्माण संघा' ला!

आरामसेन : पण लवकर पुरवतील का ते पंचवीस लाख पंखे?

चतुरसेन : होय महाराज. आठ दिवसांत पुरवतील.

आरामसेन : मग उकाड्याचा त्रास घालवायला लवकरच 'दहा पैशांत पंखा पुरवू', अशी राज्यात दवंडी पिटवा. पण चतुरसेन, पंखा हातात धरून सारखा हलवायचा म्हणजे हात दुखणार नाही का?

चतुरसेन : नाही. प्रजेच्या हातांना त्रास होणार नाही, याची काळजी घेऊ.

आरामसेन : असं? वाहवा! तुम्ही फार अक्कलवंत आहात.

चतुरसेन : कसचं कसचं महाराज!

आरामसेन : जा मग. लवकर तयारीला लागा.

चतुरसेन : आठ दिवसांत पंचवीस लाख पंखे तयार होतील. प्रजेला फक्त दहा पैशांना पंखा मिळेल. प्रजा सुखात राहील. आमची सर्वत्र वाहवा होईल. आम्ही जन्मभर सुखानं राज्य करू!

(चतुरसेन समाधानाने हसतो. आरामसेनला मुजरा करतो व जातो. मधला पडदा पडतो.)



## प्रवेश दुसरा

(आरामसेन चतुरसेनची वाट पाहत आहे. इकडून तिकडे फेऱ्या घालतो आहे.)

आरामसेन : कोण आहे रे तिकडे? (दासी येते.)

दासी : आज्ञा करावी महाराज.

आरामसेन : चतुरसेन आले नाहीत अजून?

दासी : नाही. पण येतीलच एवढ्यात. कालपासून स्वस्त पंख्यांची विक्री सुरू झाली आहे ना, प्रजा ते पंखे विकत घेण्यासाठी प्रचंड गर्दी करते आहे. प्रत्येकाला पंखा मिळावा यासाठी प्रधानजी जातीनं लक्ष घालत आहेत. (चतुरसेन येतो.)

चतुरसेन : महाराजांचा विजय असो! दहा पैशांत पंखा मिळाला म्हणून प्रजा बेहद खूश आहे. ती तुम्हांला तोंड भरून धन्यवाद देत आहे.

आरामसेन : पण काय हो चतुरसेन, दहा पैशांत पंखा तयार झाला हे नवलच म्हणावं लागेल!

चतुरसेन : तर! तो सटरफटर वस्तुनिर्माण संघ आहेच तसा कुशल आणि युक्तिबाज!

आरामसेन : पण दहा पैशांत त्याला किती नफा मिळणार?

**चतुरसेन :** **महाराजं, आपलं हित आणि प्रजेचं कल्याण हाच या व्यवहारातला नफा!**

**आरामसेन :** **फार उदात्त विचार आहेत त्या संघाचे. कोण प्रमुख आहे त्या संघाचा? आम्ही त्याचा दरबारात सत्कार करू, त्याला मोठं बक्षीस देऊ.**

**चतुरसेन :** (नम्रपणे वाकून किंचित हसतो.) **महाराज, मीच आहे त्या संघाचा प्रमुख!**

**आरामसेन :** **वाहवा! तुम्ही आमचे नुसते प्रधान नाही तर जिवलग दोस्त झालात. या, मला तुम्हांला कडकडून मिठी मारू द्या.** (जवळ घेऊन मिठी मारतो.)

(बाहेर प्रजेचा आरडाओरडा व गोंधळ — 'राजाचा धिक्कार असो —')

**आरामसेन :** **ही काय गडबड आहे?** (दासी प्रवेश करते.)



| | |
|---|---|
| दासी : | महाराज, चिडलेली प्रजा राजवाड्याबाहेर गोळा झाली आहे. प्रत्येकाच्या हातात फाटलेला पंखा आहे. |
| आरामसेन : | फाटलेला? चतुरसेन, तुम्ही फाटके पंखे पुरवलेत प्रजेला? |
| चतुरसेन : | नाही महाराज. |
| आरामसेन : | मग जा. प्रजेचं काय म्हणणं आहे ते ऐका. सगळ्यांना शांत करा. (बाहेर — 'चतुरसेन लबाड आहे', 'त्याला शिक्षा करा' अशा आरोळ्या ) |
| दासी : | प्रजेचे पुढारी तुम्हांला भेटू इच्छितात. |
| आरामसेन : | पाठव त्यांना आत. (दासी जाते.) चतुरसेन, तुम्ही काय लबाडी केलीत? |
| चतुरसेन : | काही नाही महाराज. (दोन पुढारी येतात.) |



पहिला पुढारी : महाराजांचा जयजयकार असो!

आरामसेन : आपली काय तक्रार आहे?

पहिला पुढारी : (पंखे दाखवत) प्रजेला हे असे पंखे पुरवून तुम्ही लुबाडलं आहे. पंखे अगदीच तकलादू आहेत. वापरताक्षणीच ते तुटले.

आरामसेन : काय हो चतुरसेन? ही काय भानगड आहे? पंखे वापरताक्षणीच तुटले?

चतुरसेन : महाराज, त्यांनी ते पद्धतशीर वापरले नसतील.

दुसरा पुढारी : आम्हांला काय पंखे वापरायची अक्कल नाही? प्रजेचं काहीही चुकलं नाही.

चतुरसेन : पण चुकलं नसेल तर पंखे कसे तुटतील महाराज? प्रजेनं पंखे वापरताना काहीतरी घोटाळा केलेला आहे.



पहिला पुढारी : कसला घोटाळा?

चतुरसेन : पंखा कसा वापरला तुम्ही?

दुसरा पुढारी : (पंखा हातात धरून वारा घेतो.) हा असा हातात धरून डोक्यासमोर फिरवला. (पंखा तुटतो.) आणि हा असाच तुटला.

चतुरसेन : (जोरजोरात हसून) मग तुटणारच! पंखा हातात धरायचा, इथवर तुम्ही बरोबर केलंत. पण पुढे चुकलात. डोक्यासमोर पंखा हलवायचा नाही, तर पंख्यासमोर डोकं हलवायचं. तशी सूचनाही लिहिली आहे पंख्यावर. तुम्ही सूचना न वाचता पंखा वापरलात तेव्हा तो तुटणारच.

दुसरा पुढारी : ही बनवाबनवी आहे. आम्हांला असे मूर्ख समजू नका. महाराज, ही चतुरसेनची लबाडी आहे. पंखे कोणी तयार केले ते सांगा. (चतुरसेन हळूच तिथून पळून जातो.)

आरामसेन : सटरफटर वस्तुनिर्माण संघानं!

दुसरा पुढारी : म्हणजे या चतुरसेनानंच. महाराज, हा गुन्हेगार आहे. प्रजेला लुबाडणारा चोर आहे. त्याला पकडा, शिक्षा करा. कुठे पळाला चतुरसेन?

आरामसेन : कोण आहे रे तिकडे...? त्या चतुरसेनाला

**शोधा. पकडा...** (पुढारी धावत बाहेर जातात... आरामसेन मात्र आ वासून उभा राहतो... तेव्हाच पडदा पडतो.)

**स्वाध्याय :**

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  १. राजाने सुटी देऊन दरबार पुढे का ढकलला?
  २. प्रजेची तक्रार दूर करण्यासाठी चतुरसेनने कोणता उपाय सुचवला?
  ३. राजाने त्यासाठी काय केले?
  ४. प्रजा राजाचा धिक्कार का करू लागली?
  ५. पंखे तुटून जाऊ नयेत म्हणून चतुरसेनने कोणती युक्ती योजली?
- **असे कोण म्हणाले?**
  १. "आम्हांलाही उकाड्यामुळे काही सुचत नाही."
  २. "जनतेला पंखे द्या."
  ३. "त्यांना फक्त दहा पैशात पंखा मिळेल अशी व्यवस्था करतो."
  ४. "प्रजेला हे असे पंखे पुरवून तुम्ही लुबाडले आहे."
  ५. "महाराज, ही चतुरसेनची लबाडी आहे."
- **खालील शब्दांच्या विरुद्ध अर्थाचे शब्द लिहा.**
  नाराज, कुशल, विक्री, प्रचंड.
- **वाक्यात उपयोग करा.**
  (१) दवंडी पिटणे. (२) वाहवा होणे. (३) धन्यवाद देणे.

* * *



# १२. तिसरा मेणा

ही पेशवाईतली गोष्ट आहे. त्या वेळी भारतातील अनेक भागांत इंग्रज व्यापार करत होते. व्यापाराच्या सुरक्षिततेसाठी सैन्य हवे, अशी बतावणी करत त्यांनी लष्कर वाढवले. त्यांनी पदरी सैन्य ठेवले. भारतातील राजे आणि इंग्रज यांच्यांत लहानमोठ्या चकमकी सतत चालू असत.

सवाई माधवराव पेशव्यांच्या काळात इंग्रज आणि मराठे यांची एक मोठी लढाई झाली. लढाईनंतर सलोख्याचा तह झाला.

तहातील एका अटीप्रमाणे इंग्रजांचा वकील पेशव्यांच्या दरबारात राहावा, असे ठरले.

त्याप्रमाणे एक इंग्रज वकील पुण्याला आला. संगमाजवळ त्याने आपली छावणी थाटली.

या वकिलाचे नाव होते मॅलेट.

त्याच्या मदतीसाठी छावणीत शंभर माणसे ठेवण्याची परवानगी पेशव्यांनी दिली होती.

मॅलेट नम्रपणाने वागत असे. तहातील अटींचे नीट पालन करत असे. सवाई माधवरावांना मॅलेटने काही गमतीजमतीच्या

यांत्रिक गोष्टी भेट म्हणून दिल्या. त्यात पृथ्वीचा गोल, दुर्बिणी अशा वस्तू होत्या. पेशव्यांची आणि मॅलेटची मोठी दोस्ती जमली.

एके दिवशी नेहमीसारखा सवाई माधवरावांचा दरबार भरला. सगळे मानकरी, सरदार आणि नाना फडणीस तेथे होते.

दरबारात मॅलेटने पेशव्यांना एक अर्ज दिला–'आमच्या सवयीचं खाणंपिणं पुण्यात मिळत नाही. तेव्हा रोजच्या रोज मुंबईहून ते आणायची परवानगी असावी. त्यावर जकात लावली जाऊ नये.'

नाना फडणिसांनी अर्ज मान्य केला. पण अट घातली, की मुंबईहून दररोज तीनच मेणे येतील. त्यांत फक्त खाण्या-पिण्याचे पदार्थ असतील.

त्याप्रमाणे संगमावरील छावणीत रोज तीन मेणे येऊ लागले. मॅलेट खुशीत होता. आपल्या सवयीचे खास खाणेपिणे त्याला रोजच्या रोज मिळत होते.

एके दिवशी काय झाले?

मॅलेट न्याहरीला बसला होता. न्याहरीतील पदार्थ त्याच्या आवडीचे होते, पण आज त्याला ते रुचकर लागत नव्हते. कारण त्याचे मन अस्वस्थ होते.

मेण्यांची नेहमीची वेळ होऊन गेली होती, तरी मेणे आलेले नव्हते. तो विशेष आतुरतेने त्यांची वाट पाहत होता.

इतक्यात मेणे आल्याची वर्दी मिळाली.

मॅलेटच्या चेहेऱ्यावर हास्य उमटले.

पण पुन्हा वर्दी आली. नेहमीसारखे तीन मेणे आलेले नाहीत. एक मेणा जकात नाक्यावरच अडवण्यात आला आहे.

मॅलेटचे हास्य एकदम मावळले. त्यांनी पेशव्यांकडे तक्रार केली, की तुम्ही दिलेला शब्द पाळला नाही.

तेथे नाना फडणीस हजर होते.

नाना म्हणाले, ''वकीलसाहेब अशा गोष्टीत शब्द दोन्ही बाजूंनी पाळायचे असतात. एका बाजूने नाही. आजवर तुमचे खाद्यपदार्थांचे तीन मेणे कधी अडवले गेले होते काय? मग



आजच असे का घडले असेल? तीनपैकी एक मेणा का अडवण्यात आला असेल?''

मॅलेट काहीही बोलेना.

''सांगू मी? अहो त्या एका मेण्यातले खाद्यपदार्थ तुमच्या आणि आमच्या दोघांच्याही आरोग्याला अपायकारक होते.''

मॅलेटने मान खाली घातली.

खाद्यपदार्थांच्या नावाखाली तोफा-बंदुका आणायचा मॅलेटचा डाव होता. त्याचा डाव नानांच्या जागरूक हेरखात्याने हाणून पाडला.



**वर्दी** — बातमी. **जागरूक** — सावध.

**स्वाध्याय :**

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. इंग्रज मराठे यांच्या तहातील मुख्य अट कोणती होती?

२. इंग्रजांच्या वकिलाने सवाई माधवरावांना भेटीदाखल कोणत्या वस्तू दिल्या?

३. मॅलेटने पेशव्यांकडे कोणती परवानगी मागितली?

४. एक मेणा जकात नाक्यावरच का अडवला?

५. मॅलेटने मान खाली का घातली?

- **गाळलेले शब्द भरा.**

नाना म्हणाले, "वकीलसाहेब, अशा गोष्टीत ...... दोन्ही ...... पाळायचे असतात, ...... बाजूने नाही. आजवर तुमचे ...... तीन मेणे कधी ...... गेले होते काय?"

- **वाक्यात उपयोग करा.**

(१) चकमकी होणे. (२) पालन करणे. (३) अट घालणे. (४) मन अस्वस्थ होणे.

- **खालील शब्दांचे अर्थ लिहा.**

छावणी, दरबार ,सलोखा.



# १३. आम्ही सारे

भारतवासी आम्ही सारे, भारतीय भाई
जमीन पावन भारतातली ही अमुची आई ।।

अनेक भाषा अनेक भूषा
अनेक सीमा अनेक रेषा
वंद्य तरी हा एक नकाशा
भिन्न देवळे भिन्न देव पण भेदभाव नाही ।।

विविध पाकळ्या एक फुलाच्या
विविध तारका एक नभाच्या
अनेक धारा एक नदीच्या
अनेकतेवर एक तिरंगा झळकत हा राही ।।

अमंगलाचे तोडून बंधन
न्यायनीतिला करून वंदन
इथे उभारू नवीन नंदन
हीच प्रतिज्ञा घुमवू आम्ही दिशांतून दाही ।।
भारतवासी आम्ही सारे, भारतीय भाई ।।

**पावन** – पवित्र. **भूषा** – वेश. **अमंगल** – अपवित्र.
**नंदन** – नंदनवन.

**स्वाध्याय :**

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  १. भारतात कोणकोणत्या बाबतीत विविधता आहे?
  २. भारतात नवीन नंदन उभारण्यासाठी काय करावे, असे म्हटले आहे?
- **'आम्ही भारतीय आहोत' या वाक्यातील 'आम्ही' या ठिकाणी मी, तू, तो, ते यांचा उपयोग करून चार वाक्ये लिहा.**
- **समान अर्थाचे शब्द लिहा.**
  वंदन, नभ, सारे.
- **खालील ओळीचे वाक्यात रूपांतर करा.**
  ''हीच प्रतिज्ञा घुमवू आम्ही दिशांतून दाही''





# १४. मित्र

राजू नावाचा एक तरतरीत मुलगा होता. तो अभ्यासात, खेळात आणि पोहण्यात हुशार होता. एके दिवशी त्याला ताप चढला. आईने त्याला डॉक्टरकडे नेले.

''डॉक्टर, काय झालंय हो माझ्या राजूला?'' आईने चिंतेने विचारले.

डॉक्टर म्हणाले, ''घाबरू नका, आपण राजूला दवाखान्यात दाखल करू.''

दवाखान्यात राजूवर शस्त्रक्रिया झाली, पण काही उपयोग झाला नाही. राजूच्या कमरेखालील शरीर एकदम लुळे पडले. पाय सुकत गेले.

आता राजू शाळेत कसा जाणार? तो एकसारखा रडायचा. आईला विचारायचा, ''आता मी कसा शिकू?''

आईजवळ उत्तर नव्हते. राजूसमोर तिला रडताही येत नव्हते. ती एवढेच म्हणायची, ''तुला शाळेत जाता आलं नाही तरी मी तुला घरी शिकवीन. आपण खूप अभ्यास करू.''

पण तेवढ्याने राजूचे समाधान झाले नाही. त्याला शाळेतच जायचे होते. इतर मुलांच्याबरोबर शिकायचे होते. राजूच्या हट्टापुढे आईचे काही चालले नाही. तिने त्याला हातांवर उचलले. आपल्या पाठीवर त्याचे दप्तर टाकले आणि शाळेत नेले.

तो मोठा झाल्यावर त्याला एका विशिष्ट प्रकारच्या खुर्चीवर बसावे लागे. ती खुर्ची, दप्तर आणि राजू या सगळ्यांना रोज शाळेत कसे न्यायचे हा तिला प्रश्न पडला. त्याचे बाबा तर सारखे फिरतीवर असायचे.

त्यांच्या घराजवळच एक रिक्षावाला राहायचा. त्याला राजूच्या आईची ही अडचण कळली. तो म्हणाला, ''मी राजूला रोज रिक्षातून घेऊन जाईन.''

आईला खूप आनंद झाला.

राजूची शाळा नियमित सुरू झाली. तो रिक्षावाला रोज यायचा. राजूला उचलून रिक्षात ठेवायचा. त्याची खुर्ची आणि दप्तर बरोबर न्यायचा. पाहता पाहता तो रिक्षावाला आणि राजू यांची खूप मैत्री जमली.

त्या रिक्षावाल्याचे नाव अरुण होते. तो राजूला नेहमी म्हणायचा, ''गड्या, तू परीक्षेत पहिला नंबर मिळव.''

राजू म्हणायचा, ''नक्की मिळवीन!''

तो अभ्यास करू लागला. शालान्त परीक्षा झाली. त्या परीक्षेत त्याचा पहिला क्रमांक आला. अरुणला अतिशय आनंद झाला. राजूचा आत्मविश्वास वाढला. प्रसंगाने खचून



जाऊ नये, बुद्धीच्या बळावर हवे ते मिळवता येते, हे त्याला पटले.

राजूने मोठमोठ्या परीक्षा दिल्या. त्यांत चांगले गुण मिळवले. तो मोठा अधिकारी झाला. त्याची चाकांची खुर्ची सोबतीला होतीच, पण या काळात अरुणची मात्र एवढ्यात भेट झाली नव्हती. राजू अधिकारी झाला म्हणून त्याच्या चाहत्यांनी

त्याचा सत्कार केला. त्या वेळी गावातील मोठमोठे लोक समारंभाला आले. सर्वांनी राजूला हार घातले. त्याची तोंड भरून स्तुती केली.

राजू मात्र अस्वस्थ होता. त्याची नजर दूरवर कुणाला तरी शोधत होती आणि त्याला हवी ती व्यक्ती दिसली. चाकाच्या खुर्चीवर बसून तो तिकडे निघाला.

साहेब कुठे निघाले? सगळे आश्चर्याने बघत होते. साहेब रिक्षावाल्याजवळ जाऊन थांबले. त्याचा हात साहेबांनी प्रेमाने हातात घेतला. दोघांचाही कंठ दाटून आला.

तो रिक्षावाला अरुण होता!

---

**खचून जाणे** — धीर सुटणे. **अस्वस्थ** — बेचैन.

**स्वाध्याय :**

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  १. राजूच्या आईला कोणता प्रश्न पडला?
  २. रिक्षावाला राजूला कोणत्या प्रकारे मदत करी?
  ३. राजूचा आत्मविश्वास कशामुळे वाढला?
  ४. राजूच्या चाहत्यांनी त्याचा सत्कार का केला?
  ५. सत्काराच्या वेळी राजू अस्वस्थ का होता?
- **खालील शब्दांचे अर्थ लिहा.**
  तरतरीत, शस्त्रक्रिया, विशिष्ट, आत्मविश्वास, सत्कार.
- **सत्कार समारंभाच्या वेळी झालेल्या राजू आणि अरुण यांच्या भेटीचा प्रसंग ३ ते ४ वाक्यांत लिहा.**

★ ★ ★

# १५. संत कबीर

सुमारे पाचशे वर्षांपूर्वीची ही गोष्ट आहे.

निमा आणि निरू नावाचे एक विणकर जोडपे होते. त्यांना मूलबाळ नव्हते. एकदा एका तलावाच्या काठावर त्यांना गोजिरवाणे बालक सापडले. ते फडक्यात गुंडाळलेले होते. आसपास शोध करूनही कुणी आढळले नाही. शेवटी निमा आणि निरू यांनी ते बाळ उचलून आपल्या घरी आणले आणि त्याचे नाव ठेवले 'कबीर'. कबिराचे आईबाप कोण, कुठले याचा उलगडा कधीच झाला नाही. त्या विणकराच्या घरीच कबीर वाढू लागले.

ते रानात शेळ्या चरायला नेत. घरात कापड विणण्यात मदत करत. कापड विणता विणता ते देवाचे नाव घेत. गोड गळ्याने भजने गात.

लहानपणापासूनच कबिरांना वाटे, आपल्याला कोणीतरी गुरू भेटावा आणि त्याच्याकडून आपल्याला ज्ञान लाभावे. पंडित रामानंद नावाचे एक ज्ञानी पुरुष जवळपासच राहतात, असे कबिरांना कळले. या रामानंदांकडून आपण ज्ञान मिळवावे, म्हणून त्यांनी एक युक्ती योजली. रोज सूर्योदयाच्या अगोदर रामानंद नदीवर स्नानाला जात. एके दिवशी कबीर नदीच्या घाटावर डोळे मिटून पडून राहिले. रामानंद नेहमीप्रमाणे पहाटेस नदीवर स्नानासाठी निघाले. अंधारात त्यांना पायाजवळ नीट दिसले नाही. चुकून त्यांचा पाय पायऱ्यांवर झोपलेल्या

बालकाला लागला. लागलीच त्यांनी त्याला उठवले. त्या वेळी त्यांच्या मुखातून 'राम राम' असे शब्द निघाले. ते शब्द ऐकताच कबीर उठले. त्यांनी रामानंदांचे पाय धरले आणि म्हणाले, "आजपासून तुम्ही माझे गुरू झालात. यापुढे मीही नेहमी 'राम राम' म्हणत जाईन."

तेव्हापासून रामानंद आणि कबीर ही गुरुशिष्यांची जोडी जमली.

संत कबीर म्हणायचे, 'कुणीही आपापसांत भांडू नका. सगळी माणसं समान आहेत. लहान-मोठा कुणी नाही.' कबीर देवळात जायचे, मशिदीतही जायचे. ते लोकांना म्हणत, 'राम-रहीम ही एकाच देवाची वेगवेगळी नावं आहेत. देव इमारतींमध्ये राहत नाही. देव प्रत्येक माणसात असतो. देवाधर्माच्या नावाने भांडू नका. देवाचे नाव घ्या. सर्वांशी प्रेमाने वागा. पोथ्या वाचून कुणीही पंडित होत नसतो. 'प्रेम' या शब्दाचा अर्थ जाणेल तोच खरा पंडित.'



संत कबीर सर्वांवर माया करायचे, प्रेम करायचे. 'दया आणि परोपकार हाच खरा धर्म', असे ते सांगत. प्रेम हाच धर्म ही शिकवण लोकांना देण्यासाठी त्यांनी कविता रचल्या. त्यांना दोहे म्हणतात. एका दोह्यात संत कबिरांनी म्हटले आहे —

पोथी पढि पढि जग मुआ पंडित भया न कोइ ।
ढाई अक्षर प्रेम का, पढे सो पंडित होइ ।।

संत कबिरांचे दोहे सगळीकडे गायले जातात.

---

**पढि पढि** — वाचून वाचून. **मुआ** — मृत. **भया** — झाला. **ढाई** — अडीच. **सो** — तो.

**स्वाध्याय :**

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  १. निमा आणि निरू यांना बाळ कोठे सापडले?
  २. विणकराच्या घरी कबीर काय काय करत असत?
  ३. लहानपणापासून कबिरांची कोणती इच्छा होती?
  ४. कबिरांच्या गुरूंचे नाव काय होते?
  ५. कबिरांनी कोणता उपदेश केला?
- **पाठातील पुढील अर्थाचे शब्द लिहा.**
  कथा, संतान, माता-पिता, तोंड.
- **खालील शब्द वाक्यात योजा.**
  (१) ज्ञानी, (२) सूर्योदय, (३) गोजिरवाणे, (४) ठावठिकाणा.

★ ★ ★

# १६. सुरवंटराव

'आमच्याशी कुणी मुळी बोलतच नाय
आमच्याशी कुणी मुळी खेळतच नाय'

सुरवंटराव उदास झाले
पानेच पाने खातच सुटले
खाऊन खाऊन सुस्त झाले
कोश गुरगटून झोपून गेले.

खूप दिवसांनी झोपून उठले,
तर एक मोठे नवलच घडले.
उठल्या उठल्या आले खुशीत
''हे काय भलतंच! हे काय आक्रीत!
आज मला हे असं काय होतंय?
इकडून तिकडे उडावं वाटतंय.''
पाहतात राव तर जादूच केवढी
पाठीवर फुटलेली पंखांची जोडी

पंख मखमली काळे काळे
त्यांवर ठिपके केशरी पिवळे
आता नुसते भरार भरार
फुलांची संगत सुंदर फार

फुलांनी म्हटले ''या या.
संकोच कसला? मध प्या.''

सुरवंटराव म्हणतात, ''आज आहे तरी काय?
जगालाच पंख फुटलेत काय?''

---

आक्रीत — नवल.

स्वाध्याय : ❁ ❁ ❁ ❁ ❁ ❁ ❁ ❁ ❁ ❁ ❁ ❁ ❁

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  १. उदास झाल्यावर सुरवंटरावांनी काय केले?
  २. झोपून उठल्यावर सुरवंटराव खुशीत का आले?
  ३. त्यांना कोणती जादू झाल्याचे दिसून आले?
  ४. पंख फुटल्यावर सुरवंटराव काय करू लागले?
- **सुरवंटाचे फुलपाखरू कसे होते ते समजून घ्या. प्रत्येक अवस्थेचे चित्र काढा आणि ते रंगवा.**
- **खालील ओळींत योग्य त्या विरामचिन्हांचा उपयोग करा.**

  फुलांनी म्हटले या या
  संकोच कसला मध प्या

★ ★ ★




# १७. देवाघरचे नाते

परवा मला कोणीतरी भेटले. ते म्हणाले, 'यशवंतराव, तुमच्या मामांचे गावाकडचे घर पडले आहे.' मला आठवते, ते घर मातीचे होते. घराच्या म्हणून अशा काय आठवणी असायच्या? आठवणी आहेत घरातल्या आणि शेजारच्या माणसांच्या. आमच्या घरासमोरील उंच भिंतीला चिकटून एका खोलीचे एक छोटे झोपडीवजा घर होते. त्यात राहत होते एक मुसलमान कुटुंब. कुटुंबाची प्रमुख होती कुलसुमदादी. माझ्या आजीच्याच वयाची होती ती.

मी दहा-अकरा वर्षांचा असेन. मला आठवते, कुलसुमदादीची आमच्या घरी ये-जा असे. सकाळ-संध्याकाळ काहीतरी मागायला, द्यायला, सांगायला कुलसुमदादी आली नाही, असे कधीच झाले नाही. तिच्या नातवांच्या संगतीने मी त्या घरी जाऊ लागलो. पण कुलसुमदादी आणि माझ्यात एक नवाच आजी-नातवाचा जिव्हाळा निर्माण झाला होता. सकाळी शेळीचे दूध काढून झाले, की त्यातले थोडे दूध ती माझ्यासाठी घेऊन येणार. आठवड्यातून कधी जेवणासाठी तर कधी न्याहरीसाठी मला हळूच बोलावून घेणार आणि मीही जाणार.

वर्षांमागून वर्षे हे नाते वाढत राहिले. सुटीत घरी पोचलो, की माझा पहिला कार्यक्रम ठरलेला. आजीच्या पाया पडायचे ते थेट पाठीमागच्या भिंतीवरूनच खाली अंगणात उडी घ्यायची. तीरासारखे धावत जाऊन घरासमोरील कुलसुमदादीच्या घरी चक्कर टाकायची. ती चुलीपुढे काहीतरी करत बसलेली असायची. ती उठून जवळ येई. माझी नि माझ्या आईची विचारपूस करण्यासाठी म्हणे —

''बेटा येसू, इटा अक्का अच्छी है?''

आणि मी म्हणे, ''छान!''

असे हे देवाघरचे नाते.

एकदा फार कडक उन्हाळा पडला. रात्रीच्या वेळी आम्ही सर्व पुढच्या छोट्याशा अंगणात झोपत असू. वैशाखाच्या अमावास्येला मध्यरात्रीच्या सुमारास आरडाओरडा सुरू झाला. मी दचकून जागा झालो. पाहतो तो मध्यान्हीच्या वेळी प्रकाश असतो तसा प्रकाश होता. आमच्या घराच्या समोरच्या त्या वाड्यातील कडब्याच्या गंजींना आग लागली होती. कुणी ती विझवण्यासाठी येऊ नये म्हणून की काय, अधूनमधून दगडही पडत होते. एक-दोन दगड आमच्या अंगणातही आले. संरक्षणासाठी आम्ही सगळे घरात शिरलो.

माझ्या थकलेल्या आजीचा जीव कुलसुमदादीसाठी बेचैन झाला होता. ती म्हणत होती, ''अरे, ही आग कुलसुमचे घर खाऊन टाकील. बाहेर जाऊन कुणी पहा.''

आजीचे हे शब्द ऐकले आणि कुणाला न सांगता, न

विचारता मी धावत धावत कुलसुमदादीच्या घराकडे पळालो. रस्त्यावर शुकशुकाट होता, दगड पडतच होते. कुलसुमदादीचा मुलगा अब्दुल्ला धडधडणाऱ्या आगीकडे पाहत उभा होता. आगीतील काही ढलपे आपल्या घराच्या छपरावर पडताहेत हे तो बघत होता. कुलसुमदादी शेळ्या सोडून मोकळ्या करण्यासाठी धडपडत होती. मी तिच्याजवळ गेलो नि ओरडलो–

''आमची आजी तुला बोलावते आहे.''

ती काय म्हणते इकडे लक्ष न देता मी तिला अक्षरशः ओढीत आमच्या घरी आणले. आग पहाटेपर्यंत धडधडत राहिली. कुलसुमदादीचा जीव शेळ्यांत अडकला होता; परंतु अब्दुल्ला पाठोपाठ शेळ्याही घेऊन आला. कुलसुमदादीची झोपडी आगीत नष्ट झाली होती. पण ती, तिचा मुलगा, नातू आणि शेळ्या आमच्या अंगणात सुरक्षित होत्या.

सकाळी कुलसुमदादी माझ्या आजीला सांगत होती, ''आजी, ह्यो है किस्मत का खेळ, घर गेले पण जान तरी बचला.''



त्या सुटीनंतर माझे आजोळला जाणे थांबले. बऱ्याच वर्षांनी आजी वारली तेव्हा गेलो. आजी तर गेलीच होती, पण समोर कुलसुमदादीचे घर नव्हते. आजीसारखी तीही गेली होती आणि तिचा मुलगा, नातवंडे कुठे गेली होती ते मात्र मला कोणी सांगू शकले नाही.

आमचे आजोळचे घर पडले म्हणून मी परवा ऐकले, तेव्हा मनात ज्या अनेक आठवणींनी गर्दी केली, त्यांत मला कुलसुमदादीचा आवाज ऐकू येत होता —

''आबई, येसू कुठे है? मैं दूध लाया हूँ.''

---

**जिव्हाळा** – प्रेम. **मध्यान्ह** – दुपार. **किस्मत** – नशीब. **जान** – जीव.

**स्वाध्याय :**

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

  १. मामाचे घर पडले आहे हे ऐकताच यशवंतरावांना काय आठवले?

  २. कुलसुमदादी यशवंतरावांच्या घरी कशासाठी येत असे?

  ३. मध्यरात्री आरडाओरडा का सुरू झाला?

  ४. यशवंतरावांनी धावत जाऊन काय केले?

- **असे कोण कोणास म्हणाले?**

  १. ''बेटा येसू, इटा अक्का अच्छी है?''

  २. ''आमची आजी तुला बोलावते आहे.''

  ३. ''आजी, ह्यो है किस्मत का खेळ.''

- **चार राष्ट्रपुरुषांची छायाचित्रे जमवा व त्यांची नावे लिहा.**

★ ★ ★

# १८. कबड्डी

कबड्डी हा आपल्या देशातला फार जुना खेळ आहे. महाराष्ट्रात त्याला पूर्वी 'हुतुतू' असे नाव होते. इतर राज्यांतही हा खेळ वेगळ्या नावांनी खेळला जात असे. बंगालमध्ये या खेळाला 'हाडुडू' म्हणत. पंजाबात आणि उत्तर प्रदेशात त्याला 'सीची-पक्की' किंवा 'झावरगंगा' असे म्हणत. गुजरात राज्यात या खेळाला 'माडी माडी' म्हणत. दक्षिण भारतात या खेळाला म्हणत 'चेडू गुडू'. आता मात्र सर्वत्र या खेळाला 'कबड्डी' म्हणतात.

कबड्डी हा खेळ दोन संघांत खेळला जातो. प्रत्येक संघात सात खेळाडू आणि पाच राखीव खेळाडू असतात.

कबड्डीचे क्रीडांगण अकरा मीटर लांब आणि सहा मीटर रुंद आखले जाते. रुंदीच्या रेषांलगत बाहेरच्या बाजूला एकेक मीटरचे अंतर वाढवले जाते. या भागाला 'राखीव क्षेत्र' असे नाव आहे. त्याची लांबी, क्रीडांगणाच्या लांबीइतकीच असते. यामुळे क्रीडांगणाचे एकंदर क्षेत्र अकरा मीटर लांब आणि आठ मीटर रुंद होते. क्रीडांगणाबाहेर चार मीटर जागा मोकळी ठेवतात.त्या मोकळ्या जागी प्रत्येक अंगणाच्या अंतिम रेषेबाहेर दोन मीटर अंतरावर आयत आखून तेथे बाद झालेल्या खेळाडूंना बसवले जाते. जागा अपुरी असल्यास सरपंच त्याबद्दल वेगळा निर्णय घेऊ शकतात.

क्रीडांगणाच्या मध्यभागी असणाऱ्या रेषेमुळे क्रीडांगणाचे दोन सारखे भाग पडतात. या प्रत्येक भागाला 'अंगण'

म्हणतात. प्रत्येक अंगणात मध्यरेषेला समांतर अशी एक रेषा असते. तिला 'निदान रेषा' म्हणतात. क्रीडांगणाच्या मध्यभागी असलेल्या रेषेपासून 'निदान रेषा' अडीच मीटर अंतरावर असते.

नाणेफेक करून सामना सुरू होतो.

दोन्ही संघांतले खेळाडू आपापल्या अंगणात पवित्रे घेऊन उभे राहतात. मग एका संघाचा खेळाडू 'कबड्डी कबड्डी' अशा स्पष्ट शब्दांत सूर धरून विरोधी संघाच्या अंगणात चढाई करतो. विरोधी संघाच्या अंगणात घुसलेल्या खेळाडूला श्वास तोडता येत नाही. दम न तोडता त्याने निदान रेषा ओलांडून, दम घालीतच मध्य रेषा ओलांडून आपल्या अंगणात परतले





पाहिजे. विरोधी पक्षातल्या खेळाडूंना स्पर्श करून सूर धरणारा परतला तर स्पर्श झालेले विरोधी खेळाडू बाद होतात आणि तितके गुण त्या खेळाडूंच्या संघाला मिळतात. पण विरोधी संघातील खेळाडूंनी जर त्याला पकडले आणि दम तुटण्यापूर्वी तो आपल्या अंगणात परतू शकला नाही, तर तो बाद होतो आणि विरोधी संघाला एक गुण मिळतो.

बाद झालेल्या खेळाडूंच्या ऐवजी विरोधी संघातील बाद झालेल्या खेळाडूंना एकास एक याप्रमाणे जीवदान मिळते.

दोन्ही संघांतील खेळाडू आळीपाळीने चढाई करतात.

बाल गटांसाठी पंधरा पंधरा मिनिटांचे दोन डाव खेळले जातात. दोन डावांच्या मध्ये पाच मिनिटांचा विश्राम-काल असतो. विश्राम-कालानंतर दोन्ही संघ आपापली अंगणे बदलतात.

दोन डावांच्या अखेरीस अधिक गुण मिळवणारा संघ विजयी म्हणून घोषित केला जातो. गुणसंख्या बरोबरीची

झाल्यास लगेच असलेल्या खेळाडूंनिशीच पाच-पाच मिनिटांचे आणखी दोन डाव खेळण्यात येतात. मात्र या दोन डावांच्या मध्ये विश्राम-काल दिला जात नाही. यानंतरही बरोबरी झाल्यास पहिला गुण मिळवणारा संघ विजयी ठरतो.

जुनी परंपरा असलेल्या या भारतीय खेळाचा समावेश आशियाई क्रीडामहोत्सवात करण्यात आला आहे.

**स्वाध्याय :**

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

  १. कबड्डी या खेळाला इतर कोणकोणती नावे आहेत?

  २. खेळाडू केव्हा बाद होतो?

  ३. जादा डाव खेळूनही बरोबरी झाल्यास कोणता संघ विजयी ठरतो?

- **योग्य शब्द भरून वाक्ये पूर्ण करा.**

  १. कबड्डी .................... संघात खेळला जातो. प्रत्येक संघात .................... खेळाडू असतात.

  २. अंगणात मध्य रेषेला .................... अशी एक रेषा असते, तिला .................... म्हणतात.

  ३. दोन डावांच्या मध्ये .................... मिनिटांचा .................... असतो.

  ४. गुणसंख्या बरोबरीची झाल्यास .................... मिनिटांचे .................... डाव खेळण्यात येतात.

- **तुम्हांस आवडणाऱ्या चार खेळांची नावे लिहा.**
- **कबड्डीच्या क्रीडांगणाची माहिती लिहा.**

★ ★ ★



## १९. या भारतात

या भारतात बंधुभाव नित्य वसू दे।
दे वरचि असा दे ।
हे सर्व पंथ संप्रदाय एक दिसू दे,
मतभेद नसू दे ।।धृ.।।
नांदोत सुखे गरिब अमिर एकमतानी।
मग हिंदु असो ख्रिश्चन वा हो इस्लामी
स्वातंत्र्य-सुखा या सकलांमाजि वसू दे।
दे वरचि असा दे ।।१।।
सकळांस कळो मानवता, राष्ट्रभावना।
हो सर्व स्थळी मिळुनि समुदाय-प्रार्थना।
उद्योगि तरुण वीर शीलवान दिसू दे।
दे वरचि असा दे ।।२।।

हा जातिभाव विसरुनिया एक हो अम्ही।
अस्पृश्यता समूळ नष्ट हो जगातुनी।
खळनिंदका-मनीहि सत्य न्याय वसू दे।
दे वरचि असा दे ।।३।।

सौंदर्य रमो घराघरांत स्वर्गियापरी।
ही नष्ट होऊ दे विपत्ति भीति बोहरी।
तुकड्यास सदासर्वदा सेवेत कसू दे।
दे वरचि असा दे ।।४।।

---

**खळनिंदक** — दुष्ट आणि निंदा करणारा. **विपत्ती** — संकट. **बोहरी** — अभद्र.

**स्वाध्याय :**

- **पूर्ण वाक्यात उत्तरे द्या.**
  १. देशात मतभेद असू नयेत म्हणून कवी कोणता वर मागत आहे?
  २. देशातील तरुण कसे असावेत असे कवीला वाटते?
  ३. घराघरांतून आनंद कसा निर्माण होईल?
- **वाक्यात उपयोग करा.**
  (१) बंधुभाव (२) संप्रदाय (३) शीलवान (४) विपत्ती
- **पुढील ओळींचे वाक्यात रूपांतर करा.**
  १. सकळांस कळो मानवता राष्ट्रभावना.
  २. खळनिंदका मनीही सत्य न्याय वसू दे.

* * *



# २०. काझीरंगाच्या जंगलात

मुसळधार पाऊस, घनदाट जंगले व चहाचे मळे यांसाठी आसाम हे राज्य प्रसिद्‌ध आहे. तिथे काझीरंगा नावाचे एक जगप्रसिद्‌ध अभयारण्य आहे. त्यात गेंडे, वाघ, हरणे असे विविध प्रकारचे प्राणी आढळतात. पण काझीरंगाचे नाव जगात सर्वत्र पोहोचले आहे ते तिथल्या एकशिंगी गेंड्यांमुळे! ते गेंडे पाहण्यासाठी दरवर्षी हजारो पर्यटक काझीरंगास भेट देतात. हे गेंडे या अभयारण्यात मुक्तपणे भटकत असतात.

या अभयारण्यात घडलेली ही गोष्ट. ती समीर नावाच्या एका धाडसी मुलाची आहे. समीर हा तिथल्या मुख्य अधिकाऱ्याचा मुलगा. वडिलांबरोबर अनेकदा जंगलात जायची संधी त्याला मिळत असे. अभयारण्याला लागूनच चहाचे काही मळे होते. एकदा एका मळ्यात चहाची खुडणी चालू होती. खुडणी करणाऱ्या बायका चहाची पाने खुडून आपापल्या पाठीवर असलेल्या टोपल्यांत भरत होत्या. एवढ्यात एकच गलका झाला, 'गेंडा आला, गेंडा आला.'

हातांतली कामे टाकून साऱ्या बायका पळत सुटल्या. काही झाडावर चढून बसल्या.

लोकांनी खूप आरडाओरडा करून गेंड्याला पिटाळून लावायचा प्रयत्न केला. पण व्यर्थ! कुणीतरी जंगल

अधिकाऱ्यांना कळवले. समीरचे बाबा लगेच जीप घेऊन निघाले. समीरनेही यायचा हट्ट धरला. नाइलाजाने समीरच्या बाबांनी समीरलाही सोबत घेतले.

जीप मळ्यात घुसवली. पाहतात तो काय, समोरच गेंडा उभा! जीप थांबली. गेंडा जीपवर चाल करून आला. जीपचा ड्रायव्हर घाबरला. जीपमधून उडी टाकून तो धूम पळत सुटला. गेंड्याने धाडदिशी जीपला धडक दिली. समीरचे बाबा एकदम जीपच्या बाहेर फेकले गेले. समीर मात्र न घाबरता जीपमध्येच समोरच्या दांडीला घट्ट धरून उभा राहिला. एक धडक मारून त्या गेंड्याचे मुळीच समाधान झाले नाही. त्याने आता आपला मोर्चा समीरच्या बाबांकडे वळवला. तो समीरच्या बाबांना धडक मारणार एवढ्यात समीरने प्रसंगावधान राखून जीपचा हॉर्न जोरात वाजवला. हॉर्नचा आवाज ऐकताच गेंडा क्षणभर गोंधळला. त्याने तोंड वळवून पुन्हा जीपलाच एक धडक मारली. पण समीरचे धैर्य खरोखरच वाखाणण्याजोगे! एवढी धडक बसूनदेखील तो जीपच्या दांडीला घट्ट पकडून उभाच






राहिला. गेंडा पुन्हा वडिलांकडे जातोय हे पाहून त्याने पुन्हा हॉर्न वाजवला. गेंडा पुन्हा धडक द्यायला आला. त्याने जीपला एक जोरदार धडकही मारली, पण त्याचे शिंग जीपच्या चाकात अडकले. गेंडा आता जीप उलटवणार, तोच समीरने पटकन जीपच्या बाहेर उडी मारली. सर्वांना हायसे वाटले. समीरने धावत जाऊन वडिलांना मिठी मारली.

एव्हाना वनरक्षक हत्यारांसह मळ्यात येऊन पोहोचले होते. त्यांनी मोठ्या हिकमतीने त्या गेंड्याला पुन्हा अभयारण्यात पिटाळले.

**वयाच्या सातव्या वर्षी बिकट प्रसंगी विलक्षण धैर्य दाखवून समीरने सर्वांची वाहवा मिळवली. या असामान्य धैर्याबद्दल समीरला राष्ट्रपती पारितोषिक मिळाले!**

---

**अभयारण्य** – प्राण्यांसाठी राखून ठेवलेले जंगल. **पर्यटक** – प्रवासी.

**स्वाध्याय :**

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  १. काझीरंगास पर्यटक कशासाठी भेट देतात?
  २. जीपचा ड्रायव्हर घाबरून का पळत सुटला?
  ३. गेंड्याने जीपला धडक देताच समीरने काय केले?
  ४. धैर्य दाखवल्याबद्दल समीरला काय मिळाले?
- **खालील शब्दांचा अर्थ लिहून त्या शब्दांचा स्वतःच्या वाक्यात उपयोग करा.**
  (१) जगप्रसिद्ध, (२) अभयारण्य.
- **जोड्या जुळवा.**

| | |
|---|---|
| (१) मुसळधार | गेंडा |
| (२) धाडसी | धैर्य |
| (३) एकशिंगी | पाऊस |
| (४) जगप्रसिद्ध | पारितोषिक |
| (५) असामान्य | समीर |
| | अभयारण्य |

★ ★ ★



# २१. अभंग

वृक्षवल्ली अम्हा सोयरी वनचरे ।
पक्षीही सुस्वरे आळविती ।। १ ।।

येणे सुखे रुचे एकांताचा वास ।
नाही गुण दोष अंगा येत ।। २ ।।

आकाश मंडप पृथिवी आसन ।
रमे तेथे मन क्रीडा करी ।। ३ ।।

कंथाकमंडलु देह उपचारा ।
जाणवितो वारा अवसरु ।। ४ ।।

हरिकथा भोजन परवडी विस्तार
करोनि प्रकार सेवू रुची ।। ५ ।।

तुका म्हणे होय मनासी संवाद ।
आपुलाचि वाद आपणांसी ।। ६ ।।

— संत तुकाराम

**वृक्षवल्ली** – झाडे आणि वेली. **वनचरे** – वनात राहणारे. **वास** – राहणे. **कंथा** — गोधडी.

**स्वाध्याय :** ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  १. निसर्गाच्या सहवासात मन का रमते?
  २. देह उपचारासाठी कोणकोणत्या गोष्टींची गरज आहे असे संत तुकाराम म्हणतात?
- **खालील अर्थाच्या अभंगाच्या ओळी लिहा.**
  १. झाडे-वेली आणि पशु-पक्षी आमचे नातलग आहेत.
  २. आकाशाचा मांडव आणि भूमीची बैठक अशा ठिकाणी माझे मन गुंगून राहते.
- **विरुद्ध अर्थाचे शब्द लिहा.**
  सुख, गुण, सुस्वर.
- **समान अर्थाचे शब्द लिहा.**
  आकाश, क्रीडा, मंडप.
- **चार संतांची नावे लिहा.**





# २२. साधूचा घोडा

## प्रवेश पहिला

(एका साधूचा आश्रम. साधू घोड्याच्या पाठीवरून हात फिरवत आहे.)

साधू : **कल्याण, आपण दिवसभर जंगलात फिरलो, माझ्याप्रमाणंच तूही थकला असशील. दऱ्याखोऱ्यांतून किती चपळाईनं मार्ग काढत होतास तू!** (एक सेवक येतो.)

सेवक : **साधू महाराज, तुम्ही घोड्याशी बोलत आहात? कल्याण हे तुमच्या घोड्याचं नाव आहे का?**

साधू : होय. अत्यंत कल्याणकारी घोडा आहे हा. आता मला लोकांची सेवा वेगानं करता येते. हाती घेतलेल्या कामात निश्चित यश मिळतं.

सेवक : शिवाय हा रुबाबदार दिसतो. माझ्या मालकाला तुमचा घोडा आवडला. या घोड्यासाठी ते वाटेल ती किंमत द्यायला तयार आहेत. हा घोडा मिळाल्याशिवाय त्यांना चैन पडणार नाही.

साधू : पण मला विकायचा नाही हा घोडा. पंचक्रोशीत असा उमदा घोडा शोधूनदेखील सापडणार नाही.

सेवक : पण तुमच्यापेक्षा माझ्या मालकाला या घोड्याचा उपयोग अधिक होईल.

साधू : तुझा मालक कोण आहे?

सेवक : एक सरदार आहे.

साधू : त्याचं नाव रणवीरसिंग आहे?

सेवक : होय. पण तुम्ही नाव कसं ओळखलंत?

साधू : ते माझ्याकडे आले होते. 'मला तुमचा हा घोडा हवा आहे. तुम्ही मागाल ती किंमत द्यायला माझी तयारी आहे', असं ते म्हणत होते. मी घोडा त्यांना विकावा, असा ते आग्रह करत होते.

सेवक : पण घोडा विकणार नाही, हे तुम्ही त्यांना निक्षून सांगितलंत, असं ते म्हणत होते.

साधू : होय. हा घोडा माझा जीव की प्राण आहे.

सेवक : ते आलं लक्षात. तुम्ही घोडा विकत नाही हे खरं, पण तो कुणी चोरला तर!



साधू : ते शक्यच नाही. मी त्याला बाहेर बांधत नाही. रात्रीदेखील त्याला माझ्याच खोलीत ठेवतो.

(तेवढ्यात अंगाभोवती घोंगडे घट्ट गुंडाळलेला, डोके आणि तोंड उपरण्याने बांधलेला एक माणूस येतो. तो कण्हत असतो, त्याचे अंग थरथर कापत असल्याचे दिसते.)

माणूस : साधू महाराज, माझ्यावर दया करा. मला मदत करा.

साधू : तू कोण आहेस?

माणूस : मी एक शेतकरी आहे.

साधू : काय झालंय तुला?

माणूस : ताप भरला आहे. डोकं सपाटून दुखतं आहे. शेतात काम करत होतो. एकाएकी थंडी वाजू लागली.

साधू : तुला कसली मदत हवी आहे?



माणूस : मला लवकर घरी जायचं आहे. तापामुळे पाय लटपटत आहेत. घरी चालत जाणं शक्य नाही. तुमचा घोडा द्या. घरी पोहोचताच माणसाकरवी परत पाठवीन. मला अधिक बोलवत नाही.

साधू : ठीक आहे. आजारी माणसाला मदत करणं साधूचं कर्तव्यच आहे. ने हा घोडा. (तो माणूस घोड्यावर बसतो आणि लगेच अंगाभोवतीचे घोंगडे काढून फेकतो.)

सेवक : (त्याच्याकडे पाहून) अरे, हे तर माझे मालक!

साधू : घोडा विकत घ्यायला आलेले सरदार?

माणूस : होय. मीच तो सरदार. आता घोडा माझा झाला आहे. तू हा घोडा विकायला तयार नव्हतास. घरात बांधून ठेवत होतास. त्यामुळे त्याची चोरीही करता येत नव्हती आणि मला तर तो हवा होता. चल रे घोड्या....

साधू : ठीक. तुझं कल्याण असो. मला फसवण्यासाठी तू आजारी माणसाचं सोंग घ्यायला नको होतंस. यापुढे आजारी माणसावर कुणी विश्वास ठेवणार नाही. त्याला कुणाची मदत मिळणार नाही.

माणूस : (जोराने हसतो.) चल रे घोड्या. (घोड्याला टाच मारतो. घोडा वेगाने निघून जातो.)





## प्रवेश दुसरा

(सरदाराचे घर. सरदार खुशीत बसला आहे. त्याचा एक मित्र बाजूला बसला आहे. दोघे बोलत आहेत. सेवक बाजूला उभा आहे.)

मित्र : **सरदार, तुम्ही आणलेला घोडा फारच उत्तम आहे. गावात प्रत्येकजण तुमच्या घोड्याची स्तुती करत आहे. तो साधू मात्र घोडा गेला म्हणून खूप हळहळला. त्यानं खाणं-पिणंच सोडलं आहे, असं लोक सांगतात.**

सरदार : **मूर्ख आहे तो. घोडा म्हणजे एक जनावर. त्याच्यासाठी खाणं-पिणं कशाला सोडायचं?**

मित्र : **त्याला फसवून तुम्ही घोडा पळवलात ना, त्याचं त्याला फार दुःख झालं.**

सरदार : **वेडाच आहे तो. यापुढे आजारी माणसावर कुणी विश्वास ठेवणार नाही, असं म्हणाला मला!**

मित्र : **ते मात्र खरं आहे हं. आजारी माणसाकडे लोक संशयानं पाहू लागले आहेत.**

सरदार : **खोटं आहे. खोटं आहे.** (सेवक येतो.)

सेवक : **मालक, तुम्हांला बाईसाहेब आत बोलावत आहेत.**

सरदार : **कशाला?**

सेवक : **बाळाला खूप ताप भरला आहे.**

सरदार : **अस्सं? मग तू ताबडतोब डॉक्टरकडे जा आणि त्यांना घेऊन ये.** (सेवक जातो.) **मित्रा, बैस. मी आलोच माझ्या बाळाला पाहून.** (सरदार आत जातो.)

मित्र : (खिडकीशी जातो. घोडा पाहतो.) **खरंच, किती छान दिसतो हा घोडा! कुणालाही हवाहवासा वाटेल. पैसे खर्चूनदेखील असा घोडा क्वचितच मिळेल.** (सेवक बाहेरून येतो. तो घाबरलेला आहे.) **अरे, तू तर घाबरलेला दिसतोस. का?**

सेवक : **डॉक्टर येत नाहीत. ते म्हणतात, 'सरदार फसवा आहे. आजाऱ्याचं सोंग घेऊन त्यानं साधूचा घोडा लुबाडला आहे. आता मुलाला आजाऱ्याचं सोंग देऊन त्याचा मला लुबाडण्याचा बेत दिसतो.'** (सरदार आतून येतो. तो खूप घाबरलेला आहे. चेहऱ्यावर काळजी आहे.)

सरदार : **अरे, डॉक्टर कुठे आहेत? बाळाची प्रकृती खूपच बिघडलेली आहे. त्याची आई तर रडायलाच लागली आहे. डॉक्टर केव्हा येणार आहेत?**

सेवक : **ते येणारच नाहीत.**

सरदार : **का?**

मित्र : **तुझा मुलगा आजारी आहे, यावर त्यांचा विश्वास नाही.**



**सरदार :** **अरेरे, साधूला फसवण्यात माझं चुकलं. डॉक्टर आले नाहीत तर माझा बाळ बरा होणार नाही.** (सेवकाला) **अरे, तो घोडा ताबडतोब साधूला परत कर.** (साधू येतो.)

**साधू :** (बाहेर पाहत) **या डॉक्टर या. बाळाला तपासा. तो बरा झाला पाहिजे.**

**डॉक्टर :** (आत येत, साधूला) **तुमच्या आग्रहामुळे मी आलो.**

**सरदार :** **साधू महाराजांनी तुम्हांला येण्याचा आग्रह केला?**

**डॉक्टर :** **होय. ते मला म्हणाले, 'सरदाराने लबाडी केली, पण त्याची शिक्षा त्या बाळाला का देता? चला लवकर.'**

**सरदार :** (साधूच्या पाया पडतो.) **मला क्षमा करा महाराज!**

---

**पंचक्रोशी** – पाच कोसांतील परिसर. **जीव की प्राण** – अतिशय लाडका.

**स्वाध्याय :** ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  १. सरदाराने साधूला कोणता आग्रह केला?
  २. सरदाराने आजारी माणसाचे सोंग का घेतले?
  ३. डॉक्टर सरदाराच्या घरी यायला का तयार नव्हते?
  ४. साधूने डॉक्टरांना काय सांगितले?
- **खालील पर्यायांपैकी योग्य पर्याय लिहा.**
  १. सरदाराला घोडा फार आवडला कारण —
  (अ) घोडा साधूच्या संगतीत होता.
  (ब) घोड्याचे नाव कल्याण होते.
  (क) घोडा रुबाबदार व वेगवान होता.
  २. साधूने शेतकऱ्यास घोडा दिला, कारण —
  (अ) शेतकरी आजारी होता.
  (ब) सरदार घोडा पळवून नेईल ही भीती होती.
  (क) शेतकरी गरीब होता.
  ३. डॉक्टर सरदाराच्या घरी आले, कारण —
  (अ) बाळाला खूप ताप आला होता.
  (ब) साधूने आग्रह केला होता.
  (क) सरदार भरपूर पैसे देईल असे वाटले.
- **शब्दसमूहासाठी एक शब्द वापरा.**
  (१) घोड्यावर बसणारा. (२) देवावर विश्वास ठेवणारा. (३) शोध लावणारा. (४) लेख लिहिणारा.

★ ★ ★

## २३. मनाचे श्लोक



मना सर्वथा सत्य सोडू नको रे
मना सर्वथा मिथ्य मांडू नको रे
मना सत्य ते सत्य वाचे वदावे
मना मिथ्य ते मिथ्य सोडूनि द्यावे ।। १ ।।

अहंतागुणे सर्वही दुःख होते
मुखे बोलिले ज्ञान ते व्यर्थ जाते
सुखी राहता सर्वही सुख आहे
अहंता तुझी तूचि शोधूनि पाहे ।। २ ।।

सदा आर्जवी प्रीय जो सर्व लोकी
सदासर्वदा सत्यवादी विवेकी
न बोले कदा मिथ्य वाचा त्रिवाचा
जगी धन्य तो दास सर्वोत्तमाचा ।। ३ ।।

फुकाचे मुखी बोलता काय वेचे
दिसेदीस अभ्यांतरी गर्व साचे
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे
विचारे तुझा तूचि शोधून पाहे ।। ४ ।।

**मिथ्य** — खोटे. **वाचे** — शब्दात. **अहंता** — मीपणा (अहंकार) **आर्जवी** — नम्र. **सत्यवादी** — खरे बोलणारा. **विवेकी** — विचारपूर्वक वागणारा. **अभ्यांतरी** — मनात. **वाचाळता** — बडबड. **विचारे** — विचार करून.

**स्वाध्याय :**

- **खालील ओळी पूर्ण करा.**

  मना सत्य ते ..............................

  .............................. सोडून द्यावे

  न बोले कदा ..............................

  .............................. दास सर्वोत्तमाचा

- **खालील शब्दांचे अर्थ लिहा.**

  सर्वथा, कदा, दास.

- **खालील ओळींचा अर्थ तुमच्या शब्दांत लिहा.**

  १. मना सर्वथा सत्य सोडू नको रे

  २. अहंतागुणे सर्वही दुःख होते

- **शब्द लिहा आणि वाचा.**

  आर्जवी, त्रिवाचा, सर्वथा, सर्वोत्तम.

- **वळणदार अक्षरांत लिहा.**

  क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे.

★ ★ ★



## २४. सण हा पोळ्याचा

पिंपरूड नावाचे एक खेडे आहे. मुंबईला राहणारा सागर तिथे आला होता. त्याच्या चुलतभावाचा त्या दिवशी वाढदिवस होता. वाढदिवस धूमधडाक्यात झाला. दुसऱ्या दिवशी शेजारच्या वाड्यात वाजंत्री वाजू लागली. बँडही गर्जू लागला, आणि मध्येच डफावरही थाप पडू लागली. घुंगुरांचे आवाज घुमू लागले. लोकांची ये-जा सुरू झाली. सागर घरातून पळत बाहेर आला. पाटलांच्या वाड्यात गेला.

तिथे एक बैलांची सुंदर जोडी उभी होती. पांढरे स्वच्छ आणि धष्टपुष्ट बैल डौलात उभे होते. त्यांच्या समोरच ही वाद्ये वाजत होती. सागरला काय चालले आहे ते कळेना. तो पाटीलकाकांना म्हणाला, ''काका, आज या बैलांचं लग्न आहे का? की त्यांना कुठं विजय मिळाला आहे?''

पाटलांना त्याचे प्रश्न ऐकून गंमत वाटली, पण सागरने मुंबईला वाजंत्री किंवा बँड ऐकला होता तो फक्त असल्याच प्रसंगी!

पाटीलकाका त्याला म्हणाले, ''लग्न वगैरे नाही रे सागर. आज पोळा नावाचा सण आहे. हा शेतकऱ्यांचा आणि त्यांच्या बैलांचा सण आहे.''

सागर म्हणाला, ''म्हणूनच का त्यांच्या पाठीवर नवे नवे रंगीत कपडे घातले आहेत?''

''ते कपडे नाहीत, त्यांना 'झूल' म्हणतात,'' काका म्हणाले.

सागरने 'पोळा' या सणाची कविता वाचली होती. त्यातल्या ओळी त्याला आठवत होत्या. तो काकांना तसे म्हणालाही आणि त्या चार ओळी गुणगुणलादेखील —

सण हा पोळ्याचा। मान असे बैलांचा।
शेतकरीही आनंदी। कृतज्ञतेने पूजित त्यांना ।।

पाटीलकाकांनी सागरचे कौतुक केले. ते म्हणाले, ''सागर, तू जे आता गुणगुणलास, ते आज प्रत्यक्षच पहा. पोळ्याचा हा सण महाराष्ट्रात सगळीकडे साजरा करतात. कोल्हापूरकडे त्याला 'बेंदूर' म्हणतात, तर कुठे कुठे त्याला 'बैलपोळा' असेही म्हणतात. शेती हा भारतातला प्रधान उद्योग. शेतात धान्य पिकतं. त्यावरच आपण जगतो. शेतातून धान्य काढताना जमिनीची मशागत करावी लागते. बी पेरावं लागतं. या सगळ्या कामांत बैलांचा खूप उपयोग होतो. बैलांना खूप मेहनत होते. त्यांच्याशिवाय धान्य पिकवणं अशक्यच. बैलांचे आपल्यावर केवढे उपकार होतात. त्या उपकारांची आठवण म्हणूनच वर्षातून एकदा हा पोळ्याचा सण साजरा केला जातो. मुंबईसारख्या मोठ्या शहरांतून हा सण पाहायलासुद्धा मिळत नाही ना?''

सागर म्हणाला, ''नाही ना. म्हणूनच आज मी थांबणार आहे तो पाहायला.''

''पण हा एक दिवसाचा सण नाही. तो तीन दिवस चालतो. श्रावण वद्य अमावास्या हाच सणाचा खरा दिवस. दक्षिण महाराष्ट्रात हा सण आषाढ पौर्णिमेला साजरा करतात.'' पाटील म्हणाले, ''पहिल्या दिवशी बैलांचे खांदे हळद, तेल, तूप वगैरे लावून खूप चोळतात. गरम पाण्यानं शेकून काढतात. वाजतगाजत बैलांची 'खांदपूजा' करतात.''

सागर लक्षपूर्वक ऐकत होता. पाटीलकाका पुढे म्हणाले,



''दुसऱ्या दिवशी बैलांना स्वच्छ आंघोळ घालतात. त्यांच्या शिंगांना रंग लावतात आणि त्यांवर सुंदर नक्षी काढतात. तिसरा दिवस तर खास सणाचा.''

सागर म्हणाला, ''म्हणजे आजचा ना?''

सागर हे सर्व कौतुकाने पाहत होता. त्या दिवशी बैलांना खूप सजवले होते. पाठीवर झूल होती. शिंगांच्या टोकांवर गोंडे घातले होते. गळ्यात रुईच्या फुलांच्या माळा आणि घुंगरू बांधले होते. कपाळावर मखर शोभत होते. मग बैलांचे पाय धुतले. त्यांची पूजा झाली. पुरणपोळीचा नैवेद्य खायला दिला.



शेतावर काम करणारी सगळी माणसे आणि गावातली मंडळी पाटलांकडे जेवायला होती. पुरणपोळीची मेजवानी झाली. दारापुढे दोन्ही बाजूंना पळसाच्या फांद्या ठेवल्या होत्या आणि दारांना आंब्याच्या पानांची मंगल तोरणे बांधली होती.

दुपारनंतर गावातल्या सगळ्या बैलांचा पोळा भरला. ग़ावातले सगळे सजलेले बैल एका मैदानात येऊ लागले. स्वच्छ केलेल्या मैदानात एक लांबलचक तोरण बांधलेले होते. बैलांना जोडीजोडीने त्या तोरणाखाली उभे केले. शेतकरी माणसेदेखील नवे कपडे घालून बैलजोड्यांमागे उभी होती.



बँड, ताशे, डफ वगैरे वाद्ये जोरात वाजत होती. गावातील इतर मंडळीही हा बैलांचा थाट पाहायला मैदानावर गोळा झाली होती.

तितक्यात गावच्या पाटलांची शृंगारलेली बैलजोडी वाजतगाजत आली. काका सागरला म्हणाले, ''पाहिलीस ही बैलजोडी. हिला मखरांची जोडी म्हणतात. ती जोडी इतर सगळ्या जोड्यांना फेरी घालते. मारुतीला प्रदक्षिणा घालून येते. पाटील तोरणाला हात लावतात. मग जमलेले सगळे शेतकरी ते तोरण तोडतात आणि हाती लागेल तेवढा त्याचा भाग घेऊन बैलजोड्या तिथून हलवतात. त्याला 'पोळा फुटला' असे म्हणतात.''

त्या वेळचा बैलांचा रुबाब आणि चेहेऱ्यावरची खुशी पाहून सागरला खूप गंमत वाटली. तो काकांना म्हणाला, ''बैलांनादेखील समजतं हं, की माणसं आपल्यावर प्रेम करतात म्हणून.''

काका म्हणाले, ''होय. शेतकरी आणि बैल यांच्यांत नेहमीच प्रेमाचे संबंध असतात.''

पोळा फुटल्यावर सागरदेखील एका बैलजोडीच्या पाठोपाठ गेला. ती बैलजोडी अनेकांच्या घरी गेली. तिथे सुवासिनींनी बैलांना ओवाळले. गोडधोड खायला दिले आणि बैलजोडीबरोबर आलेल्या माणसाला बिदागी दिली.

गावभर मिरवत जाणारे बैल डौलात आणि खुशीत एक-एक पाऊल टाकत पुढे जात होते. त्यांच्या डोळ्यात आनंद

आणि माणसाबद्दलची आपुलकी जाणवत होती, तर शेतकऱ्यांचे त्यांच्यापुढे नम्र होणे, त्यांचे पाय धुणे आणि पूजा करणे यातून बैलांबद्दल त्यांना वाटणारी कृतज्ञता ओसंडून वाहताना दिसत होती.

ते पाहून सागरला खूप भरून आले. त्याच्या मुखातून नकळत पुन्हा ती कविता बाहेर पडली —

**सण हा पोळ्याचा। मान असे बैलांचा।**
**शेतकरीही आनंदी। कृतज्ञतेने पूजित त्यांना।।**

---

**कृतज्ञता** — उपकाराची जाणीव. **प्रधान उद्योग** — मुख्य धंदा.
**शृंगारलेली** — सजवलेली. **बिदागी** — बक्षिशी.

**स्वाध्याय :**

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**
  १. सागर पिंपरुडला कशासाठी आला होता?
  २. तेथे त्याने दुसऱ्या दिवशी काय पाहिले?
  ३. कोल्हापूरकडे पोळ्याला काय म्हणतात?
  ४. पोळा हा सण शेतकऱ्यांचा आहे असे का म्हणतात?
  ५. पोळ्याच्या दिवशी बैलांना सजवण्यासाठी काय काय केले होते?
- **पोळा हा सण कशाप्रकारे साजरा करतात ते थोडक्यात लिहा.**
- **कोणत्याही इतर चार सणांची नावे लिहा. त्यांपैकी एकाचे वर्णन थोडक्यात लिहा.**

★ ★ ★

## २५. गाणी

### (१) तर मग गट्टी कोणाशी?

''तुझ्या गळा
माझ्या गळा
गुंफू मोत्यांच्या माळा'' —
''ताई आणखि कोणाला''
''चल रे दादा चहाटळा'' ।। १ ।।

''तुज कंठी
मज अंगठी आणखि गोफ कोणाला?''
''वेड लागले दादाला!''
''मला कुणाचे? ताईला''।। २ ।।

''खुसू खुसू
गालि हसू
वरवर अपुले रुसू रुसू!''
''चल निघ येथे नको बसू''
''घर तर माझे तसू तसू'' ।। ३ ।।

''कशी कशी
आज अशी
गंमत ताईची खाशी''
''अता गट्टी फू दादाशी''
''तर मग गट्टी कोणाशी?'' ।। ४ ।।

## (२) जो आवडतो सर्वांला

जो आवडतो सर्वांला तोचि आवडे देवाला ।। धृ ।।

दीन भुकेला दिसता कोणी
घास मुखीचा मुखी घालुनी
दुःख नेत्रीचे घेता पिऊनी
फोडि पाझर पाषाणाला ।। १ ।।

घेऊनि पंगु अपुल्यापाठी
आंधळ्यांची होतो काठी
पायाखाली त्यांच्यासाठी
देव अंथरी निज हृदयाला ।। २ ।।

जनसेवेचे बांधुन कंकण
त्रिभुवन सारे घेई जिंकून
अर्पून आपुले हृदसिंहासन
नित भजतो मानवतेला ।। ३ ।।

## (३) झिम्मा

झिम्मा खेळू ये झिम्मा नाचू ये
आकाशीच्या तारांसंगे झिम्मा खेळू ये ।।

अंधारी ही रात्र काळी
कोणी पाहीना मुळीही
एकटीच आकाशात झिम्मा खेळू ये ।।

चांदण्यांच्या चंद्रज्योती
हिमगिरी चकाकती
हासऱ्या या ज्योतीसंगे झिम्मा खेळू ये ।।

चवथीची चंद्रकोर
हळू चाले सुकुमार
नाचऱ्या या पोरीसंगे झिम्मा खेळू ये ।।

